प्रकारच्या वैरांपासून मन मुक्त होते; धैर्य उत्पन्न होते. परलोक असेल तर माझ्या या सुकर्मामुळे मला सुगतीच मिळाली पाहिजे, परलोक नसेल तर याच जगामध्ये त्यामुळे मी मोठ्या आनंदाने राहतो. जर पापी मनुष्याला पापाबद्दल शिक्षा भोगावी लागते, हा सिद्धांत खरा असेल तर मला शिक्षा भोगण्याचा प्रसंग येणार नाही. जर आपल्या पापाचे वा पुण्याचे फळ आपणाला मिळतेच असे नसून ते दुसऱ्या कोणाला तरी भोगावे लागते, हा सिद्धांत खरा असेल तर माझ्या सदाचरणामुळे मी माझेच नव्हे, तरइतर जनांचेही कल्याण करतो."

भगवान बुद्धांनी कालामांना केलेला हा उपदेश नैतिक मूल्यांचे उत्कृष्ट समर्थन होय. असे क्वचितच दुसरीकडे वाचावयास मिळेल.

प्रत्येक धर्मामध्ये काही कर्मकांड असते; काही आचारधर्म असतात. प्रत्येक धर्माचे कर्मकांड निराळे असते. मुसलमान पाच वेळा मक्का क्षेत्राकडे तोंड करून, गुडघे टेकून प्रार्थना करतात. ख्रिश्चन, यहुदी आणि मुसलमान आठवड्यातून एक दिवस सुटीचा दिवस पाळतात. दिवसातून पाच प्रार्थना हिंदू करीत नाहीत किंवा आठवड्याचा सुटीचा दिवस पाळत नाहीत. मक्केकडे तोंड करून प्रार्थना का करावी, याचे सयुक्तिक उत्तर हिंदूंना आणि ख्रिश्चनांना मिळू शकत नाही. आठवड्याचा सुटीचा एक दिवस पाळला नाही तर पाप लागते, ही कल्पना हिंदूंना मान्य होण्याचे कारण नाही. परंतु आठवड्यातून एक दिवस सुटीचा पाळणे हे उचितही ठरेल आणि विसंगत ठरणार नाही. मुसलमान आणि हिंदू देवाला प्राण्यांचा बळी देतात. हे कर्म ख्रिश्चन किंवा भागवतधर्मी हिंदू अपवित्र मानतात आणि ते खरोखरच अयोग्य आहे, ही गोष्ट आजच्या सुसंस्कृत विवेकी मनुष्याला पटण्यासारखी आहे.

भगवान बुद्धांनी कर्मकांड, यज्ञयाग या धर्माचारांपेक्षा स्तोत्र, पूजा, भजन, तीर्थयात्रा यांच्यापेक्षा मनोवृत्तीचे यथार्थ अवलोकन करून कामविकार, द्वेषबुद्धी, आळस, अस्वस्थता आणि संशय ही पाच ज्ञानाची आवरणे नष्ट करण्याचा प्रयत्न करणे याला खरा धर्म म्हणून म्हटले आहे. प्राणघात, चौर्यकर्म, व्यभिचार, असत्य भाषण, गालिप्रदान, वृथालोभ, परधनाचा लोभ यांपासून निवृत्त होण्याला महत्त्व दिले. शील, समाधी आणि प्रज्ञा ज्याच्या योगाने वाढतात तोच धर्म आणि त्यांचा ऱ्हास ज्याच्या योगाने होईल तो अधर्म. अशा तऱ्हेचा सूत्ररूप मूलभूत सिद्धांत भगवान बुद्धांनी वारंवार सांगितला आहे.

परंपरागत हिंदू धर्मामध्ये भगवान बुद्धांचा जन्म झाला; परंतु यज्ञसंस्था आणि जन्मजात चातुर्वर्ण्य यांच्यावर भगवान बुद्धांनी हल्ला केला. हा हल्ला म्हणजे एक उत्कृष्ट युक्तिवादच होय. भगवान बुद्धांच्या धर्माचा भारतात आणि भारताबाहेर जो प्रचार झाला, त्यात प्रचारक भिक्षूंचे सदाचरण आणि प्रचारक भिक्षूंचा बुद्धिप्रामाण्यवाद ही दोन मुख्य धर्मप्रचाराची साधने, प्रभावी ठरली. इस्लामने युक्तिवादाबरोबरच शस्त्राचाही धर्मप्रचाराकरिता वापर केला. ख्रिश्चन धर्म मुळात नीतिप्रधान धर्म, अहिंसाप्रधान धर्म आहे. परंतु ख्रिश्चन धर्मातही हिंसेचा मोठ्या प्रमाणात वापर केल्याचे इतिहास सांगतो. जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यावर भगवान बुद्धांनी वैचारिक हल्ला केला. तेव्हा समाजामध्ये प्रतिष्ठा, मानमान्यता आणि अधिकार प्राप्त झालेल्या वर्गावरच एका परीने वैचारिक हल्ला केला; परंतु जबरदस्त नैतिक प्रेरणा यशस्वी झाल्या. मनुष्यातील जातिभेद नैसर्गिक नाहीत. मनुष्य जन्माने श्रेष्ठ नसतो, कर्माने श्रेष्ठ होतो हा विचार त्या वेळच्या समाजरचनेला जबरदस्त धक्का देणारा होता. यज्ञसंस्थेच्या योगाने समाजातील सत्ताधारी आणि धनिकवर्ग यांची प्रतिष्ठा वाढत असे. हिंदुस्थानातील मुसलमानपूर्व राजकीय इतिहास पाहिला, तर त्यात असे आढळते की, अनेक राजांनी आणि सम्राटांनी राजसूय, अश्वमेध इत्यादी मोठमोठे यज्ञसमारंभ घडवून आणून आपली सत्तेवरील पकड दृढ केली. भगवान बुद्धांच्या नंतर अनेक शतके यज्ञसंस्थेचा प्रभाव हिंदू समाजावर होता; तो हळूहळू क्षीण होत गेला. हिंदू धर्मावर भगवान बुद्धाच्या नैतिक विचारसरणीचा खोलवर परिणाम झालेला दिसून येतो. हिंदू धर्मात मौलिक धर्ममंथन सुरू झालेले भगवद्‌गीतेवरून आणि महाभारतातील शांतिपर्वावरून लक्षात येते. भगवद्‌गीतेतील दैवी संपत्ती आणि आसुरी संपत्ती ही मानवी आचरणाची विभागणी नैतिक विवेकबुद्धीच्या कसोटीवरच झालेली लक्षात येते. मनुष्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीचे दैवी संपत्ती आणि आसुरी संपत्ती हे दोन आविष्कार ठरतात. "अभय, सत्त्वसंशुद्धी, ज्ञाननिष्ठा, योगयुक्तता, दान, दम, यज्ञ, अध्ययन, तप, सरलता, अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांती, परदोषाची उपेक्षा, प्राणिमात्रांबद्दल दया,

इंद्रियसंयम, मृदुता, लज्जा, अचांचल्य, तेज, क्षमा, धृती, शुचिता, अद्रोह, अतिमानतेचा अभाव ही दैवी संपत्ती होय. त्याच्या उलट आसुरी संपत्ती वर्णिली आहे. धार्मिकतेचा टेंभा म्हणजे दंभ, गर्व, अतिमान, क्रोध, कठोरता आणि अज्ञान ही आसुरी संपत्ती होय. दैवी संपत्ती आणि आसुरी संपत्ती ही विभागणी आणि त्यांचे भगवद्गीतेतील विवरण उच्च दर्जाच्या नैतिक जीवनावर उत्कृष्ट प्रकाश पाडू शकते.

भगवद्गीतेवर बौद्ध धर्माचा अत्यंत गंभीर परिणाम झालेला स्थितप्रज्ञाच्या विवरणावरून लक्षात येतो. या स्थितप्रज्ञाच्या विवरणामध्ये भक्तियोग, कर्मयोग किंवा ज्ञानयोग यांचे विवरण मुख्यतः नसून निर्विकार आणि शुद्धचित्त हीच स्थितप्रज्ञावस्था होय, असा एक मूलगामी विचार भगवद्गीतेने पुरस्कारिलेला आहे. या स्थितीला ब्राह्मीस्थिती किंवा ब्रह्मनिर्वाण अशी संज्ञा दिली आहे. हा एक प्रकारचा उपनिषदातील वेदांत आणि भगवान बुद्धांचा निर्वाणसिद्धांत यांचा समन्वय आहे.

विवेकबुद्धीला आणि आजच्या व्यापक अशा नव्या मानव संस्कृतीला सर्व मानवांची समता आणि एकता निर्माण करणाऱ्या नीतिधर्माचे अधिष्ठान निर्माण होणे आवश्यक आहे. आणि जगातील न्यायसंस्थेचे तेच अधिष्ठान म्हणून स्वीकारले जाणे आवश्यक आहे.



# कर्मचिकित्सा (१)

भाऊ धर्माधिकारी

अर्जुनाच्या विषादावर उतारा म्हणून क्षत्रिय-धर्माची आठवण आणि वर बुद्धियोगाचे जीवनात असलेले महत्त्वाचे स्थान याचा उपदेश वास्तविक आपले पुढचे कर्तव्य समजण्याच्या दृष्टीने अर्जुनासारख्या बुद्धिमान आणि अनन्यश्रद्धावान पुरुषाला पुरेसा व्हावा. दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीच खरे म्हणजे त्याने "नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा" असे म्हणून लढायला तयार व्हायला हवे होते. कारण बुद्धियोग ज्याला साध्य झाला नसेल त्याने आपले कर्तव्यकर्मच निष्काम-भावनेने केले पाहिजे ही कृष्णाची इच्छा त्याला कळली होती. परंतु असे दिसते की गीतेतल्या अर्जुनाची साशंकता १८ व्या अध्यायापर्यंत काही नाहीशी होत नाही. तो पुनःपुन्हा प्रश्न विचारीत राहतो. हे अर्जुनाचे स्वभावचित्रण व्यासमहाकवींच्या अर्जुनाच्या स्वभावाशी जमणारे नाही. व्यासांचा अर्जुन सबंध भारतात इतका निर्बुद्ध दाखविला गेलेला नाही. परंतु येथे अर्जुनाच्या तोंडी घातलेल्या पृच्छा या व्यासनिर्मित अर्जुनाच्या नसून व्यासशिष्यांनी आपल्या तत्त्वचर्चेकरिता निमित्ताला घेतलेल्या अर्जुनाच्या आहेत ही गोष्ट गीतेतील पुढच्या प्रश्नोत्तरीवरूनच सिद्ध होते. व्यासप्रणीत भारतावर चर्चा करताना एकमेकांची मते खोडून काढण्याकरिता म्हणा अथवा आपापल्या मतांच्या प्रचारार्थ म्हणा या प्रखर बुद्धिमान व्यासशिष्यांनी हे पुढचे प्रश्न अर्जुन-कृष्ण संवादाच्या पार्श्वभूमीवर निर्माण करून उत्तरांच्या रूपाने प्रवचने केली आहेत, असा या अध्यायांची चिकित्सा करताना सहज तर्क होतो.

३ऱ्या अध्यायापासून पुढचे सर्व अध्याय हे तात्त्विक विषयांची चर्चा करणारे अध्याय आहेत. या अध्यायांत पहिल्यापहिल्याने युद्धप्रसंगाची आठवण राखून जरी 'युध्यस्व', 'उत्तिष्ठ', 'यशोलभस्व' असे शब्द मधून-मधून पेरलेले असले तरी त्या अध्यायांतील विषयांचा अर्जुनाच्या लढण्याशी काही संबंध नाही असे दिसून येईल. पुढे पुढे तर तसे उल्लेखही आढळत नाहीत आणि कृष्ण व अर्जुन दोघेही तात्त्विक विवेचनात दिसतात.

२ऱ्या अध्यायात एका समर्थ व्यासशिष्याने बुद्धियोगाचा विषय छेडला व तो प्रतिपादन करताना बुद्धियोगापुढे "वेदातील कर्मकांड अत्यंत गौण" असे सांगितले. पण आणखी एका तितक्याच तत्त्वनिष्ठ विद्वान व्यासशिष्याला हे उद्गार योग्य वाटले नाहीत, मानवले नाहीत. त्याने आपला अध्याय अर्जुन-कृष्ण संवादाचेच रूप देऊन स्वतंत्रपणे लिहिला आणि वरील मत खोडून काढण्याचा प्रयत्न केला. तो हा ३रा अध्याय.

अर्जुनाच्या तोंडी एक प्रश्न घालून त्याचे उत्तर म्हणून वेदविहित कर्मांची अपरिहार्यता त्याने दाखविली आहे. बुद्धी श्रेष्ठ म्हणता तर वेदविहित कर्मेदेखील श्रेष्ठ, असे मागील प्रतिपादनाहून अगदी भिन्न असे मत येथे मांडले गेले आहे. २ऱ्या अध्यायातील श्लोक ४५, ४६ व ४९ यांमधील वेदांसंबंधीच्या उल्लेखाने वेदकर्मांविषयी गैरसमज, अनादर आणि उपेक्षाभाव दाखविला जात आहे, त्या योगे लोक कर्मकांडाकडे दुर्लक्ष करण्याचा संभव आहे, अशी शंका वाटून जणू या ३ऱ्या अध्यायात कर्मकांडाचे महत्त्व विस्ताराने सांगण्यात आले आहे. यावरून या अध्यायाचा कर्ता आणि २ऱ्या अध्यायाचा कर्ता हे वेगवेगळे ठरतात. कारण, आपल्याच एका मताविरुद्ध वेगळ्या अध्यायात वेगळे मत तोच प्रतिपादक कसे मांडील ?

कर्मेदेखील श्रेष्ठ, ती कशी ? कारण, शरीर आहे तेथे कर्मे आहेतच. शरीर हे प्रकृतिधर्मानुसार– म्हणजे निसर्गनियमानुसार– नित्य क्रियाशीलच राहणार. या इंद्रियांचा त्यांच्यात्यांच्या विषयांशी संपर्क ("मात्रास्पर्श") कधीही चुकविता येणार नाही. शरीर जर असे अष्टौप्रहर कार्यरतच राहणारे आहे तर मन-बुद्धिसहित शरीराला कर्मकांडातच गुंतविणे

श्रेयस्कर. वेदाने अनेक प्रकारचे यज्ञ, अनेक प्रकारची तपे व अनेक प्रकारची दाने घालून दिली आहेत. ती चित्तशुद्धीकरिताच आहेत. कर्माविषयी आस्था वाटावी म्हणून जरी वेदात फलश्रुती सांगितली असली तरी त्या फळांची कामना सोडून कर्मे करण्याने मन व बुद्धी शुद्ध होते, आसक्तिरहित होते आणि त्यामुळे मनुष्याला त्या कर्मांचा लेप लागत नाही. यालाच 'कर्मयोग' म्हणतात. या कर्मयोगाने सहजच 'नैष्कर्म्य-सिद्धी' लाभते, जी मनुष्यजीवनाचे अंतिम श्रेय मानलेली आहे (३·१९).

हे यज्ञकर्म जसे व्यक्तिगत मोक्षाचे साधन आहे तसेच ते लोकसंग्रहाचे म्हणजे लोकांचे धारण-पोषण करण्याचेही साधन आहे. या ३ऱ्या अध्यायात 'यज्ञ' हा शब्द अग्नीत आहुती टाकून देवांना संतुष्ट करणारे अनेक प्रकारचे यज्ञयाग या अर्थानेच वापरण्यात आला आहे हे त्यातील ९ ते १५ हे श्लोक वाचले असता ध्यानी येईल. 'यज्ञावाचून केलेली इतर कर्मेही बंधनकारक' म्हटले आहे. महाभारतात वर्णाश्रमधर्मानुसार करावयाचा आचार असाच अर्थ 'कर्मा' चा अर्थ मानलेला आहे (पाहा शांति. अ. २७९). या अनुषंगाने मनुस्मृती अ. १२ पाहण्यासारखा आहे. त्यात 'कर्म' म्हणजे वैदिक कर्म हाच अर्थ अभिप्रेत आहे. शंकराचार्यांनी आपल्या टीकेत 'यज्ञा' चा 'ईश्वर' असा अर्थ घेतला आहे तो अर्थात त्यांच्या मनचा आहे. ज्ञानदेवांनी "स्वधर्म जो बापा। तोचि नित्ययज्ञ जाण पां।" म्हणजे चातुर्वर्ण्यानुसार वाटचाला आलेला स्वधर्म असा यज्ञाचा अर्थ लावला आहे. त्यालाही काही आधार नाही. 'गीतारहस्य' कारांनीही "सर्व प्रजेस ब्रह्मदेवाने चातुर्वर्णविहित जी जी कर्मे लावून दिली आहेत त्या सर्वांचा 'यज्ञ' या शब्दात समावेश होतो" असे म्हटले आहे. गांधीजींनी "यज्ञ म्हणजे परोपकारार्थ, ईश्वराप्रीत्यर्थ केलेले कर्म" असा केला आहे. पण हे सर्व अर्थ 'यज्ञ' या मूळ संस्कृत शब्दाचे वास्तविक अर्थ नव्हेत. यज्ञ म्हणजे अग्नीत विधिपूर्वक आहुत्या टाकून केलेले पूजाकर्म असाच अर्थ आहे. आणि ३ ऱ्या अध्यायात याच प्रकारच्या यज्ञकर्मांचा निर्देश आहे. सगळा यजुर्वेद या प्रकारच्या यज्ञविधींचाच पुरस्कर्ता आहे. रामायण आणि महाभारत या काव्यात आणि पुराणग्रंथात याच यज्ञविधींची वर्णने आली आहेत. कौसल्या ही इक्ष्वाकु घराण्यात चालत आलेल्या अग्निपूजेची उपासिका होती आणि हे अग्निहोत्र रामाच्या भेटीसाठी ती अयोध्येबाहेर पडली होती तेव्हादेखील तिच्याबरोबर वाहून नेण्यात येत होते, असे रामायणात वर्णन आहे. रामायणातील अगस्त्याश्रमाच्या वर्णनात त्यांनी ठेवलेल्या यज्ञागारांची वर्णने आहेत. महाभारतातील सर्व वंशांचे राजे यज्ञयाग करीत असल्याची वर्णने महाभारतभर विखुरलेली आहेत. आजचा मनुस्मृती ग्रंथ हा महाभारतकालानंतरचा आहे असे विद्वान संशोधकांचे मत आहे. त्या ग्रंथातले पुढील श्लोक गीतेतील ३·१२ व १३ या श्लोकांशी साम्य दर्शविणारे आहेत :

"देवान् ऋषीन् मनुष्यांश्च पितॄन् गृह्याश्च देवताः।
पूजयित्वा ततः पश्चाद् गृहस्थः शेषभुग्भवेत् ॥
अघं स केवलं भुङ्क्ते यः पचत्यात्मकारणात्।
यज्ञशिष्टाशिनं ह्येतत् सतामन्नं विधीयते ॥

(मनु. अ. ३·११७–१८)

(अगोदर देवांना, ऋषींना, माणसांना, पितरांना व गृह्य देवतांना पूजून मग उरलेले गृहस्थाने सेवन करावे. जो स्वतःकरिताच अन्न शिजवितो, जो निव्वळ पापच सेवन करतो. यज्ञात उरलेले खाणे हेच सज्जनांचे योग्य अन्न होय.)

यज्ञसंस्था महावीर व बुद्धकाळापर्यंत चालू राहिलेली होती. तिचीच प्रतिक्रिया म्हणून अहिंसा तत्त्वाचा मोठ्या प्रमाणावर पुरस्कार झाला. पूर्वीच्या स्मार्त ग्रंथात वेदातील जीवबली द्यावयाच्या यज्ञाच्या बरोबरीने अहिंसक पंचयज्ञांचा विधी घालून देण्यात आला होता आणि ब्राह्मणवर्गाने त्यांचा पुरस्कार केला होता. हे पंचयज्ञ वर उल्लेखिलेल्या मनुस्मृतीच्या श्लोकात आले आहेत. तात्पर्य, यज्ञसंस्था ही आर्यांच्या उपासनाविधीचे अपरिहार्य असे अंग बनून राहिली होती. वेदातील 'कर्म' हे यज्ञाचे कर्मकांड होय. ते कोणीही सोडता कामा नये. यज्ञ करणे का आवश्यक याची उपपत्ती सांगताना ३ ऱ्या अध्यायात "यज्ञाने पाऊस पडतो, पावसाने अन्न निर्माण होते, अन्नामुळे भूते जगतात." अशी प्राणिमात्रांच्या जगण्याशी यज्ञाचा संबंध जोडणारी कारणे सांगितली आहेत. यज्ञामुळे पाऊस पडतो ही वेदान्तर्गत समजूतच येथे मानण्यात आली आहे हे पुढील उदाहरणांवरून स्पष्ट होईल :

१) 'इन्द्रं वर्धन्तो अप्तुरः कृण्वन्तो विश्वमार्यम्। अपघ्नन्तो अराव्णः॥" (ऋग्वेद ९·६·३५). सोमयागाला उद्देशून हा मंत्र आहे. सोमयागामुळे पर्जन्याची










वाढ होते ("इन्द्रं वर्धन्तः"), पाण्याचे लोंढे वाहतात ("अप्तुरः"), ते साऱ्या विश्वाला शोभायमान करतात ("कृण्वन्तो विश्वमार्यम्"), दुर्भिक्ष नाहीसे होते ("अपघ्नन्तो अराव्णः"), असे म्हटले आहे.

२) "हविरग्नौ हूयते सोऽग्निरादित्यमुपसर्पतिवेदः तत्सूर्योरश्मिभिर्वर्षति तेनान्नं भवति अथेह भूतानामुत्पत्ति स्थितिश्चेति हविर्जायते।" हे ब्राह्मणग्रंथातील वचन आहे. अग्नीत आहुती टाकली जाते, तो अग्नी सूर्याकडे पसरतो, तो लाभ घेऊन सूर्य आपल्या किरणांच्या साह्याने पाऊस पाडतो, त्याने अन्न उत्पन्न होते, त्यामुळे भूतांची उत्पत्ती आणि स्थिती (जगणे) होते, अशी आहुती फिरून जन्मते.

३) "अग्नेर्वै धूमो जायते धूमादभ्रमभ्राद् वृष्टिः". हे शतपथ ब्राह्मणातील वचन आहे. अग्नीपासून धूर निघतो, धुरापासून ढग बनतात, ढगांमुळे वृष्टी होते.

४) "अग्नौ प्रास्ताहुतिः सम्यगादित्यमुपतिष्ठति। आदित्याज्जायते वृष्टिर्वृष्टेरन्नं ततः प्रजाः" हे मनुस्मृतीतील वचन आहे. अग्नीमध्ये टाकलेली आहुती थेट आदित्यापर्यंत जाते. आदित्यापासून वर्षाव उत्पन्न होतो. वर्षावाने अन्न निपजते आणि अन्नापासून भूतसृष्टी निर्माण होते.

आता गीतेचा ३ रा अध्याय पाहावा. त्यात म्हटले आहे: "अन्नामुळे प्राणिमात्र होतात, पर्जन्यामुळे अन्न उत्पन्न होते, यज्ञाने पर्जन्य उत्पन्न होतो, यज्ञ कर्मकांडातून घडतो, कर्मकांड हे वेदांपासून जन्म पावते आणि वेद हे अविनाशी ब्रह्मापासून उत्पन्न होतात. म्हणून सर्वव्यापी ब्रह्म हे यज्ञामध्ये सुप्रतिष्ठित आहे." वेदमंत्रोच्चारपूर्वक यज्ञविधी करून अन्नसंतर्पण केल्याने देवांनी सुरू करून दिलेले हे सृष्टिचक्र अव्याहतपणे चालू राहते. "यज्ञाने देव संतुष्ट होतात, संतुष्ट झालेले देव माणसांना त्यांचे इष्ट भोग देतात; असे एकमेकांना संतुष्ट करून दोघेही उत्तम श्रेय प्राप्त करून घेतात." म्हणून वेदप्रणीत यज्ञ कोणालाही टाकता येत नाहीत. "यज्ञ न करता जे केवळ स्वतःसाठी अन्न शिजवितात आणि खातात ते चोर होत, ते केवळ पापच खातात. यज्ञ केल्यावर उरलेले जे खातात ते सर्व पापांपासून मुक्त होतात." वेदकाळापासून चालत आलेली ही समजूतच गीतेच्या या अध्यायात ग्राह्य मानली गेली आहे आणि तिचा हिरीरीने येथे पुरस्कार करण्यात आला आहे. हा अध्याय त्याकरिताच योजला आहे हे स्पष्ट आहे.

यज्ञ ही संस्था आर्यवंशीयांतच उत्पन्न झालेली जोपासली व वाढविली गेलेली आहे. आर्यांचे मूळ वसतिस्थान उत्तर ध्रुवाकडील थंड प्रदेश होता. हे ऐतिहासिक सत्य म्हणून आता विद्वानांनी मान्य केले आहे. या थंड प्रदेशात राहणाऱ्या लोकांना अग्नीचे विशेष महत्त्व वाटावे हे स्वाभाविक आहे. उबेसाठी अग्नी, अन्न भाजण्या-शिजवण्यासाठी अग्नी, पावसापाण्यासाठी अग्नी असा हा अग्नी त्यांच्या समग्र जीवनाचा रक्षक, मित्र आणि दैवत न बनला तरच नवल! त्या आपल्या मूळ वसतिस्थानाहून आर्य लोक दक्षिणेकडे, पूर्वेकडे, पश्चिमेकडे पसरत राहिले तरी ज्या अग्नीने त्यांचे संरक्षण केले तो त्यांचे दैवत बनलेला असल्यामुळे त्याची साथ त्यांनी सोडली नाही. भारतातल्या आर्यवंशातच नव्हे तर पर्शिया (इराण) मधला मूळ पारशी वंश, इस्रायेलचा आद्य ज्यू वंश अशा प्राचीन मानववंशातसुद्धा अग्नीची पूजा कायम राहिली आहे. आज अग्नी काड्यांच्या पेटीतील काडीत सामावता येतो. पूर्वी अग्नी पेटवायला परिश्रम पडत असत. म्हणून तो सतत धुमसत ठेवावा लागे. त्याकरिता यज्ञकुंडे सदैव पेटती ठेवलेली असत. ती तशी ठेवण्याचे काम काही कुटुंबांकडे सोपविलेले असे. त्यांना 'अग्निहोत्रिन्' असे नाव होते. अजूनही भारतात अशी ब्राह्मणकुटुंबे आहेत की ज्यांच्या घरात अग्नी सदैव धुमसत ठेवलेला असतो. पारशी लोकांची 'अग्यारी' हे प्राचीन काळचा अग्नी सतत जागृत ठेवण्याचे स्थान आजही आहे. तात्पर्य, अग्नीचा महिमा आर्यादी वंशांत फार मोठा मानलेला होता. "अग्निर्वै देवनां मुखम्" अशी त्याच्या विषयीची भावना होती. म्हणून आर्यवंशीयांच्या घराघरांत अग्नीची दैनंदिन पूजा यजनाने होत असे. आर्य गृहस्थाला 'गृहमेधिन्' (घरी यज्ञ करणारा) अशी संज्ञा होती. गृहमेधाप्रमाणेच नैमित्तिक मोठे मोठे यज्ञयागही अग्नीच्या महापूजेनिमित्त समारंभपूर्वक होत असत व त्याकरिता विशिष्ट विधी असे. ते विधी करणारे आणि करवून घेणारे याजक निर्माण करण्यात आले होते. ते ब्राह्मण. जो अग्नीचा महिमा तोच ब्राह्मणांचा. त्यांनी वेद व अग्नी यांची जपणूक करायची. पूर्वीच्या आर्यांनी आपल्या समाजाच्या आवश्यकतेनुसार दोन कर्मांकरिता दोन विशिष्ट वर्ग बनविले होते. ब्राह्मण आणि क्षत्रिय. या प्रत्येक वर्गाची संख्या आवश्यकतेपुरती—अल्पच असे. बाकीचा सर्व समाज तो 'विश्' समाज. 'विश्' या संस्कृत शब्दाचा अर्थ 'सर्व-

साधारण प्रजा ' अथवा ' लोकसमाज ' हा आहे. याचेच 'वैश्य ' हे दुसरे रूप. हा सर्वसाधारण लोकसमाज –ज्याने आपल्यापैकीच काहींना वेद व अग्नी यांचे विधिपूर्वक रक्षण करण्याचे तसेच एकंदर प्रजेचे जागरूकतेने रक्षण करण्याचे अशी दोन कामे सोपविली होती तो–आपल्या सर्वांच्या उपजीविकेच्या साधनांकडेच लक्ष देऊन असे. तो शेती करी, गोधन सांभाळी, गरजांच्या वस्तूंची निर्मिती करी, वस्तुविनिमयाचा व्यवहार करी. असे आर्य हे मुळात त्रैवर्णिक होते. 'शूद्र' हा चौथा वर्ण भारतात आल्यानंतर त्यांनी जित लोकांचा बनविला.

सारांश, यज्ञकर्म हे आर्यवंशीयांच्या कर्मकांडात फार महत्त्वाचे कर्तव्यकर्म मानले गेलेले होते. म्हणून वेदप्रणीत त्या कर्मकांडाची किंमत २ ऱ्या अध्यायाच्या कर्त्याने बुद्धियोगाहून कमी मानली ते योग्य न वाटून ३ ऱ्या अध्यायकर्त्याने स्वतंत्रपणे त्या यज्ञकर्माची महती सांगणारा अध्याय लिहिला. मात्र हे कर्म फलाची आशा न राखता करावे असे सांगितले.

अर्थात जे अध्यात्मात रत झालेले असतात, जे आत्मदर्शनातच तृप्त असतात त्यांना हे यज्ञयाग करणे व त्यापासून मिळणारे फळ उपभोगणे याची आवश्यकता वाटत नाही. ही गोष्ट या ३ ऱ्या अध्यायाचा कर्ता मानतो. कारण, यज्ञ केल्याने वा न केल्याने त्यांना काहीच साधायचे नसते, किंवा कोणाही प्राणिमात्रावर त्यांचा स्वार्थ अवलंबून नसतो. मनुस्मृतीत म्हटले आहे :

" यथोक्तान्यपि कर्माणि परिहाय द्विजोत्तमः ।
आत्मज्ञाने शमे च स्याद् वेदाभ्यासे च यत्नवान् ॥
एतद्धि जन्मसाफल्यं ब्राह्मणस्य विशेषतः ।
प्राप्यैतत् कृतकृत्यो हि द्विजो भवति नान्यथा
(अ. १२-९३,९३)

(ही जी कर्मे सांगितली ती टाकून देऊन कोणी द्विजोत्तम आत्मज्ञान, शांती आणि वेदाभ्यास यांचाच अभ्यास करीत असेल तर तेच त्याचे–विशेषतः ब्राह्मणाचे–जन्मसाफल्य समजावे. ते प्राप्त करूनच द्विज हा कृतकृत्य होत असतो, अन्य रीतींनी नाही ).

परंतु अशा ज्ञानी माणसांनीसुद्धा, त्यांना कशाचीही अपेक्षा नसली तरी, लोकांचे धारण-पोषण होण्याकरिता ( " चिकीर्षुर्लोकसंग्रहम् " ) यज्ञ करणे अवश्य आहे. ते जर ही कर्मे करण्याचे सोडून देतील तर सामान्य माणसे, जी श्रेष्ठांचे अनुकरण करणारी असतात ती, ही कर्मे करण्याचे सोडून देतील, मग ज्या यज्ञकर्मामुळे पाऊस पडून धान्ये पिकतात आणि लोकांचे भरणपोषण होते ते न होऊन प्रजांचा उच्छेद होईल. कृष्ण या अध्यायात म्हणतो– " मीसुद्धा, मला जरी काही करायचे, मिळवायचे नसले तरी, ही कर्मे करीत आहे आणि पूर्वीच्या काळी जनकादिक ज्ञानी राजर्षीनीही ही कर्मे केली. कर्मच ज्यांना कळते अशा कर्मनिष्ठ अज्ञानी माणसांची बुद्धी ज्ञात्यांनी आपल्या आचाराने चाळवू नये, उलट, आपण कर्मे करून त्यांना कर्मे करण्याकरिता प्रोत्साहन द्यावे ('जोषयेत् सर्व कर्माणि '). कारण या कर्मांवरच सृष्टीचे चक्र चालू राहणार आहे."

२ ऱ्या अध्यायात " मा ते संगोऽस्तु अकर्मणि " ( कर्मे न करण्याकडे तुझ्या मनाला गुंतवू नकोस ) असे सांगितले होते त्याचा जणू पाठपुरावा वरीलप्रकारे या अध्यायाच्या प्रतिपादकाने आपल्या दृष्टिकोणातून केला आहे. आपल्या नियत कर्माविषयी निरासक्ती ठेवावी हे सांगताना तो सांगतो : " प्रकृतीच्या म्हणजे निसर्गाच्या नियमानुसार सर्व व्यापार चालत असतात. मूर्ख मनुष्य अहंकाराला बळी पडून 'मी कर्ता' असे मानतो. ज्ञानी तसे मानीत नाही. तो समजतो की हा सारा सृष्टीचा खेळ प्रकृतीच्या गुणधर्मानुसार चालला आहे. म्हणून तो त्यात आसक्त होत नाही. सृष्टीचा व्यापार चालविण्याला पूरक होणारे यज्ञ करताना त्यांपासून मिळणाऱ्या फळांविषयी निरासक्त वृत्ती ठेवणे हा एक योग साधणे आहे. वेदात सांगितलेली व चातुर्वर्ण्याप्रमाणे करावयाची कर्मे एखादा आसक्त मनुष्य जितक्या कसोशीने करील तितक्याच कसोशीने ज्ञात्या माणसाने ती कर्मे आचरावी, फक्त फळावरील आसक्ती सोडून द्यावी. हाच 'कर्मयोग' म्हटला जातो. हा कर्मयोग आचरणारा नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त करतो. नैष्कर्म्यसिद्धी म्हणजे कर्म करून न करण्याची सिद्धी, म्हणजे कर्मबंधातून सुटका, म्हणजे मोक्ष.

नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त करण्याचा एक मार्ग दुसऱ्या अध्यायात 'बुद्धियोग' सांगितला ('बुद्धयायुक्तो यथा पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि'), तिसऱ्या अध्यायाच्या कर्त्याने यज्ञयागादी न सोडता 'कर्मयोग' आचरून ती सिद्धी साधते असे सांगितले. नियत कर्मे करीत राहणे आणि त्यातून मिळणाऱ्या फळांविषयी निरासक्ती ठेवणे हा कर्मयोगाचा गाभा. जनकादिक राजर्षीनी यज्ञयागादी कर्मे करूनच ही सिद्धी मिळविली. जनक राजा होता,


अनुक्रमणिका

सत्ता आणि विपुल संपत्ती त्याच्या हाती होती. पण तो त्या बाबतीत निरासक्त किती होता हे सांगण्याकरिता महाभारताच्या शांतिपर्वातील पुढील श्लोक नेहमी उद्धृत केला जातो :

"अनन्तमिव मे वित्तं यस्य मे नास्ति किंचन।
मिथिलायां प्रदीप्तायां न मे दह्यति किंचन ॥"
(अ. १७८.२)

(माझी संपत्ती अफाट आहे, परंतु माझे असे काही नाही. ही मिथिला जरी जळून नाहीशी झाली तरी माझे काही जळून जात नाही). हे दाखले देण्याचा हेतू हा की वर्णानुसार कर्मे कामनारहित होऊन करावी म्हणजे ती मोक्षप्रद होतात. निरासक्त वृत्तीच्या मागची प्रेरणा ही की शरीराकडून होणारी सर्व प्रकारची कर्मे प्रकृतिधर्माप्रमाणे होत असतात. तोच त्याचा 'स्वधर्म'. कर्मे करायची नाहीत म्हटले तरी माणसाला ते शक्य होत नाही. या कर्ममय लोकात कर्म न करणे हेसुद्धा एक कर्मच होते अशी विचित्र स्थिती आहे. शरीराच्या उपजत गुणधर्माप्रमाणे इंद्रियांकडून त्यांची कर्मे होत राहणारच, मग माणसाची इच्छा असो, नसो. तेथे आवर घालण्याचा उपयोग होत नाही ('निग्रहः किं करिष्यति'). कर्मे होताना त्या त्या इंद्रियांच्या विषयांशी त्यांचा त्यांचा संयोग होणार, इंद्रियांना जोडून मन–बुद्धी असल्यामुळे ती तिकडे ओढली जाऊन आपापली कामे करणार. ही जी त्यांच्याकडून आपोआप होणारी कामे ती मी करतो असे माणसाने मानणे हे खरे नाही. आणि म्हणून त्या त्या कामातून निर्माण होणाऱ्या फळाविषयी त्याने ममता बाळगणे हेही योग्य नाही. प्रकृतिधर्मानुसार होणाऱ्या कर्मांचे कर्तृत्व माणसाने मनातून सोडून द्यावे तसेच कर्मांचे फळही टाकून द्यावे– ते भोगण्याची इच्छा टाकून द्यावी. इंद्रिये–मन-बुद्धींचा विषयांशी संयोग होत असताना सुख-दुःखांच्या ज्या संवेदना इंद्रियांना व त्यांच्याद्वारा मनाला जाणवतात त्यांतून निर्माण होणारी त्या त्या विषयाची आसक्ती किंवा तिटकारा ('राग-द्वेष') त्याने मनात धरू नये. त्या योगे त्या विषयाचा संग सुटतो आणि प्रकृतिधर्मानुसार घडणाऱ्या कर्मापासून मनुष्य अलग राहतो. हीच 'नैष्कर्म्य-सिद्धी'. ती साधण्याची कर्मयोग ही युक्ती आहे. आसक्ती हा माणसाचा शत्रू आहे, ती मारून टाकली की ही सिद्धी मिळते. आसक्ती आणि तिटकारा या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. जेथे एक आहे तेथे दुसरी आहेच. म्हणून मुळातच 'मी कर्म करणारा' ही अहंवृत्ती– जी वस्तुस्थितीला धरून नाही ती–सोडून दिली म्हणजे मनुष्य पुढे असलेले कर्म राग-द्वेष न उठता करू शकेल. चातुर्वर्ण्यानुसार ठरलेली कर्मे करण्यात मनुष्याला स्वतःचा असा काही संकल्प राहात नाही व फलासक्तीही सोडल्यामुळे तो सदा कर्मबंधापासून मुक्त राहतो. "गुणा गुणेषुवर्तन्ते" (प्रकृतीचे गुण आपापल्या स्वभावानुसार वागतात), तेथे माझे काय असे मानून वर्ततो तो ज्ञानवान्. ज्ञानवान् झाला म्हणून काय कर्मे त्याला सुटतात? प्रकृती आहे तोवर तो तिच्या अधीनच राहणार. म्हणून यज्ञादी वेदविहित कर्मे सोडता येणार नाहीत. हा ३ ऱ्या अध्यायातील प्रतिपादनाचा एकूण सारांश आहे.

हे प्रतिपादन तर्काला धरून करीत असताना "मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा" (अध्यात्मवृत्तीने माझ्या ठायी सर्व कर्मे समर्पण करून) हे ३ ऱ्या अध्यायात ३० ते ३२ श्लोक स्वतःचा उल्लेख करणारे मध्येच कसे येऊ शकतात असा प्रश्न मनात उत्पन्न होतो. जी विचारधारा चालू आहे त्यांत हे ३ श्लोक विसंगत वाटतात हे कोणाही टीका वा भाष्यकाराच्या ध्यानी का आले नाही? चाललेल्या विषयाच्या संदर्भात 'माझ्या ठायी म्हणजे परमात्म्याच्या ठिकाणी सर्व कर्मे समर्पण कर' हा मुद्दा तर्कसंगतीने, म्हणजे जो विचार निःसंग आणि फलाशारहित वृत्तीचा सांगितला जात आहे त्याच्या अनुषंगाने, उत्पन्नच होऊ शकत नाही. प्रकृतीच्या गुणांविषयी सांगत असताना मध्येच हे ३ श्लोक घालून पुढे पुन्हा ३३ व्या श्लोकापासून प्रकृतीच्या प्रभावासंबंधीचेच प्रतिपादन येते. यावरून हे तीन श्लोक आगंतुक, म्हणजे मागाहून घुसडलेले, असावेत असे तर्कदृष्टीला सहज आढळून येण्याजोगे आहे. हे भक्तिसंप्रदायात बसणारे श्लोक आहेत. कृष्णाला विष्णुपरमात्म्याचा अवतार मानणाऱ्या भक्तिसंप्रदायाच्या अनुयायांनी पुढे गीतेतील अध्यायांवर आपल्या संप्रदायाचा ठसा उमटविण्याचा जो प्रयत्न केला आहे त्याचा आरंभ येथे झालेला दिसतो. ४ थ्या अध्यायाचा विचार करताना अवतारविषयासंबंधी बोलावेच लागणार आहे. तेथे हा विषय सविस्तर मांडू. या श्लोकांचा उद्देश कर्मयोग साधण्याची युक्ती सांगण्याचा असावा. म्हणजे, आपली नियत कर्मे कर्तव्यबुद्धीने करायची, फलकामनेचा त्याग

करायचा ही गोष्ट साध्य करण्याला ईश्वर अथवा ईश्वरस्वरूप कोणी अवतारी पुरुष दैवत म्हणून मानलेला ते साधन मानून त्याला त्या कर्माची फळे ‘ इदं न मम’ अशा वृत्तीने अर्पण करायची; या युक्तीने फलत्याग सुगम होतो अशी कल्पना असावी. पण हा भक्तियोग वा भक्तिमार्ग झाला. कर्मफलत्यागाचा ज्ञानमार्ग सांगत असताना मध्येच तो संबंध सोडून भक्तिमार्गाचा निर्देश होणे हे विचारसंगतीच्या दृष्टीने योग्य वाटत नाही. या कारणाने ते ३ श्लोक मला आगंतुक अर्थात क्षेपक असावेसे वाटतात.

प्रकृतिधर्मालाच ३५ व्या श्लोकात ‘ स्वधर्म ’ म्हटले आहे. मागे २ ऱ्या अध्यायाच्या ३१ व्या श्लोकात ज्या अर्थाने हा शब्द वापरला आहे त्याच अर्थाने तो येथे वापरला आहे. चातुर्वर्ण्याप्रमाणे ज्याचा त्याचा स्वधर्म ठरला आहे. चातुर्वर्ण्य गुणकर्मावर आधारलेले आहे असे पुढे ४ थ्या अध्यायात म्हटले आहे त्याचा विचार पुढे करू. येथे चातुर्वर्ण्यावर म्हणजे स्वभावगत गुणकर्मांवर आधारलेला स्वधर्म, तो उणा वा दोषयुक्त वाटला तरी, सोडता कामा नये, सोडता येत नाही असे म्हटले आहे. कारण स्वधर्म सोडून परधर्माचे, म्हणजे दुसऱ्याच्या प्रकृतिधर्माचे अनुसरण, त्याचे उच्चत्व म्हणा किंवा समृद्धी म्हणा किंवा कीर्ती म्हणा, पाहून करण्याची इच्छा करणे याच्या मुळाशी फलाशाप कारणीभूत असल्यामुळे परधर्मस्वीकार वा स्वधर्मत्याग हा नैष्कर्म्यसिद्धीच्या आड येणारा आहे, हे उघड आहे. म्हणून स्वधर्म सोडणे कर्मयोगाशी न जुळणारे आहे.

पण आता यापुढे जी ३७ ते ४३ श्लोकांची प्रश्नोत्तरी आहे तिचा या आतापर्यंतच्या उपदेशांशी संबंध काय ? अनिच्छा असतानासुद्धा मनुष्याला पापाची प्रेरणा कशाने होते हा प्रश्न स्वधर्मत्यागाच्या संदर्भाशी जोडला तरच त्याची उपपत्ती लागू शकते. आपला वर्णधर्म टाकून दुसरा वर्णधर्म घ्यावासा वाटतो तो काही कामनेमुळेच. कामना उत्पन्न होणे हेच पाप, कारण त्याने ज्ञान झाकून जाते. ‘ गुणागुणेषुवर्तन्ते ’ हे ज्ञान. असा हा संदर्भ लावावा लागतो. या उत्तरात कृष्णाच्या तोंडी या अध्यायकर्त्याने कठोपनिषदातील एक श्लोक जसाच्या तसा उद्धृत केला आहे (श्लोक ४२) हे लक्षात येते.

‘ वर्णधर्मानुसार ठरलेले कर्म निरासक्तवृत्तीने करीत राहणे व त्या कर्माचा फलत्याग करणे ’ हा कर्मयोग. तो जसा ३ ऱ्या अध्यायाचा विषय तसाच तो पुढच्या ४ थ्या अध्यायाचाही आहे. परंतु ४ थ्या अध्यायाचा घाट ३ ऱ्याहून वेगळ्या प्रकारचा आहे. म्हणून ३ ऱ्या अध्यायाची रचना ज्याने केली तोच चौथ्याचा रचयिता नसावा असे वाटण्याइतकी सबळ कारणे आहेत.

चौथ्या अध्यायाचा प्रारंभ ‘ इमं ’ या पदाने करून मागील प्रतिपादनाशी संबंध जोडण्यात आला आहे. “ हा योग मी विवस्वानाला सांगितला होता ” असे म्हणून कर्मयोगाची फोड अथवा विश्लेषण या अध्यायात करण्यात आले आहे. ३ ऱ्या अध्यायात कर्माविषयीची जी दृष्टी आहे ती या अध्यायात बदललेली आढळून येते. “ सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा ” ( ३.१० ) ही कर्माविषयीची दृष्टी तिसऱ्या अध्यायात होती. त्यात यज्ञयागांनाच नियतकर्म म्हणून त्यांवर भर देण्यात आला होता. या अध्यायात कोणतीही हाती घेतलेली कामे (“ सर्वे समारम्भाः ”) मनात इच्छा वा कामना न ठेवता त्या कामांच्या मुळाशी असलेल्या ज्ञानावर अधिष्ठित होऊन केल्याने निरुपद्रवी होतात (“ ज्ञानाग्निदग्धकर्माणं ”) असे प्रतिपादन आहे. आणि हे सांगताना अग्नीत आहुती टाकणे एवढाच एकमेव यज्ञाचा प्रकार नसून यज्ञ हे अनेक स्वरूपाचे असू शकतात, असे तिसऱ्या अध्यायाहून अगदी भिन्न मतप्रतिपादन आहे. तशा यज्ञांची उदाहरणेही या अध्यायात नमूद करण्यात आली आहेत. (पाहा ४.२५ ते ३०). द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, स्वाध्याय-ज्ञानयज्ञ इत्यादी. आता अशा यज्ञांनी पाऊस पडण्याचा सुतराम तरी संभव आहे का ? चौथ्या अध्यायात अग्नीत आहुती द्यावयाच्या यज्ञांच्या ऐवजी ‘ यज्ञ ’ची व्याप्ती प्राणायामादी संयमयज्ञांपासून ज्ञानयज्ञांपर्यंत वाढलेली आढळते, आणि त्यामुळे ‘ अग्निर्वैदेवानां मुखम् ’ अशा त्या अग्नीत दिलेली आहुती देवांना संतुष्ट करते ही कल्पना या अध्यायात मानली गेलेली नाही, उलट ज्ञानयज्ञावरच या अध्यायात भर देण्यात आला आहे असे दिसून येते (“ सर्वं कर्माखिलं पार्थज्ञाने परिभाष्यते ”– ४.३३). यावरून या अध्यायाचा कर्ता तिसऱ्या अध्यायकर्त्याहून वेगळा आहे असे मानणे वाजवी ठरते.

‘ यज्ञाने देवांना त्यांचे देणे द्या, म्हणजे यज्ञाने तुष्ट झालेले देव तुम्हाला तुमचे भोग देतील ’ (३.११) या पातळीवरून ‘ द्रव्यमय यज्ञांपेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ ’

या वेगळ्या आणि उच्च पातळीवर यज्ञकर्मांना या अध्यायात नेण्यात आले आहे. इतकेच नव्हे, तर जे जे कर्मयज्ञ म्हणून तुम्ही कराल ("यज्ञाय आचरत कर्म") ते ते ज्ञानाच्या भूमिकेवर अधिष्ठित होऊन कर्माविषयीची आसक्ती सोडून केलेले कर्म ब्रह्ममयच होऊन जाते, त्याचा लय होतो असे या अध्यायकर्त्याचे म्हणणे आहे. 'अग्नी ब्रह्म, आहुती ब्रह्म, आहुती देण्याची क्रिया ब्रह्म, आहुती जेथे पोचणार ते ब्रह्म अशी ब्रह्म आणि कर्म यांची एकरूपता ("ब्रह्मकर्मसमाधिना") या ज्ञान-यज्ञात होऊन जाते' असे त्याचे समर्पक वर्णन येथे करण्यात आले आहे (४·२४). हे सर्व यज्ञ वेदानेच सांगितलेले असून ते सर्व वेदविहित कर्मातूनच निष्पन्न झाले आहेत, केवळ अग्नीत आहुती देण्याचा यज्ञ हाच वेदविहित असे नाही, हे ज्याला कळले तो कर्मबंधातून सुटतो असे मुद्दाम सांगितले आहे (४·३२). याही उल्लेखाने ३ ऱ्या अध्यायाचा प्रतिवाद हळुवारपणे, तसा उल्लेख न करता, या अध्यायात करण्यात आला आहे हे सूक्ष्म अभ्यासकाच्या नजरेस येईल. 'गीता-रहस्य'कारांच्याही लक्षात हा भेद आला होता हे त्यांच्या पुढील उताऱ्यावरून कळून येते :

"...तथापि या अध्यायाच्या यज्ञ प्रकरणाच्या प्रतिपादनात आणि तिसऱ्या अध्यायातील प्रतिपादनात एक मोठाच भेद आहे. तिसऱ्या अध्यायात श्रौतस्मार्त अनादी यज्ञचक्र म्हणजे साक्षात तेच यज्ञ कायम ठेवले पाहिजेत असे म्हटले आहे. पण भगवान आता असे सांगतात की, यज्ञ म्हणजे केवळ देवतोद्देशाने अग्नीत तीळ, तांदूळ किंवा पशू यांचे हवन करणे, अगर चातुर्वर्ण्याची कर्मे स्वधर्माप्रमाणे पण काम्यबुद्धीने करणे, एवढाच संकुचित अर्थ समजू नका. अग्नीत आहुती टाकताना अखेरीस 'इदं न मम' – हे माझे नव्हे– असे जे शब्द उच्चारितात त्यांतील स्वार्थत्यागरूप निर्ममत्वाचे जे तत्त्व तोच यज्ञातील प्रधान भाग होय ..." माझ्या विधानाला ही एकप्रकारे पुष्टी आहे.

आणि ३ ऱ्या व ४ थ्या अध्यायात याहून अधिक ठळक व मोठा भेद हा दिसून येतो की तिसरा अध्याय फलासक्ती सोडून यज्ञकर्म करण्यावर भर देतो (३.१९) तर ४ थ्या अध्यायात सर्व भर ज्ञानावर दिलेला आढळतो. वेदविहित कर्मे करण्याच्या अंती ज्ञान झाले पाहिजे असे हा अध्याय सांगतो (४.३३). "न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते" असा त्याचा दावा आहे आणि ते ज्ञान योगाने जो सर्व दृष्टींनी सिद्ध होतो त्याला स्वत चेच स्वतःला लाभते, असे या अध्यायकर्त्याचे सांगणे आहे. हा अध्यायकर्ता 'ज्ञान' कशाला म्हणतो ? त्याचा त्याने अध्यायाच्या आरंभी-आरंभीच निर्देश केला आहे. 'मला कर्मांचा लेप लागत नाही, कर्मांच्या फळाविषयीही माझ्यात इच्छा नाही, असे ज्याला ज्ञान झाले तोच कर्मांनी बांधला जात नाही' (४.१४). येथे 'मला' म्हणजे व्यक्तीमधल्या आत्म्याला, सांख्यांच्या भाषेत 'पुरुषाला'. व्यक्ती-मधील गुणकर्म प्रकृतीतून निर्माण होतात आणि प्रकृतीचा मूळ शक्तिस्रोत हा पुरुष, किंवा वेदान्ताच्या भाषेत आत्मा, हा आहे. पण तो या गुणकर्मांच्या पलीकडे आहे. म्हणून गुणकर्मांवरून समाजात बनलेले चतुर्वर्ण जरी या आत्म्याच्या मूळ शक्तिस्रोतातून निर्माण झालेले असले तरी आत्मा वा पुरुष त्यांना कारणीभूत नाही, प्रकृती कारणीभूत आहे. म्हणून चतुर्वर्ण्यानुसार मनुष्य कर्मे, म्हणजे वेदविहित कर्मे, कर्तव्य म्हणून करीत असला तरी त्याचे मूळ रूप जो आत्मा तो त्यांपासून नित्य अलिप्तच राहतो प्रकृति-पुरुषाचे हे ज्ञान म्हणजे अनुभूती ज्याला झाली तो स्वाभाविकच कर्मांच्या बंधापासून मुक्त राहतो.

या प्रतिपादनावरून सहज लक्षात येईल की ३ ऱ्या अध्यायात 'कर्मकांडाच्या साधनांनी कर्मयोग साधून (म्हणजे कर्मफळाविषयीची अनासक्ती ठेवून) मनुष्य परमपद प्राप्त करतो' असे जे म्हटले आहे (३·१९) त्याहून भिन्न मत या ४ थ्या अध्यायात मांडण्यात आले आहे. येथे आत्मज्ञानाला महत्त्व देण्यात आले आहे आणि त्या ज्ञानामुळेच मनुष्य कर्मबंधापासून सुटतो असे स्पष्ट म्हटले आहे. म्हणजे परत २ ऱ्या अध्यायातील बुद्धि-योगाचाच पाठपुरावा, कर्मकांड गौण न करता, या अध्यायकर्त्याने केला आहे असे दिसून येते. अशा रीतीने ३ ऱ्या अध्यायातील प्रतिपादनाचा एकप्रकारे प्रतिवाद या अध्यायात केला आहे.

या अध्यायाचा दुसरा एक विशेष म्हणजे वेद-विहित कर्मे स्वधर्म म्हणून आचरीत आत्म्याचे अनु-संधान ठेवण्याविषयी सांगत असताना त्या विषयाशी मुळीच कसलाही संबंध नसलेला अवतारवाद प्रारंभी देण्यात आला आहे (४·४ ते ११). हे श्लोक काढून टाकले तरी उद्दिष्ट विषयाच्या प्रतिपादनाला काहीही उणेपणा येत नाही असे अभ्यासकाला आढळून येईल.








कृष्णाला विष्णूचा अवतार मानून उपासना करणाऱ्या वासुदेवसांप्रदायाच्या कोणा अनुयायाने हा अवतारवादाचा भाग येथे घातला असावा असे अनुमान होते. अवतारवाद हा भागवतधर्माचा भाग आहे. भागवतधर्मात म्हणजे भक्तिसंप्रदायात परमेश्वर (म्हणजे विष्णू) जगाच्या उद्धारासाठी भौतिक रूप धारण करून पृथ्वीतलावर येतो अशी कल्पना मानलेली आहे. भागवतपुराणात विष्णूच्या दशावतारांची सविस्तर वर्णने केलेली आहेत. यादवकुळातील कृष्ण हा त्या दशावतारांतीलच एक प्रधान अवतार मानला जातो आणि त्याचा एक स्वतंत्र भक्तिसंप्रदाय भारतात आजही मोठ्या प्रमाणात अस्तित्वात आहे. भगवद्गीता ही भगवान् श्रीकृष्णाच्या तोंडची असे मानले गेल्यामुळे विशेषेकरून वैष्णवसंप्रदायात गीतेचे अनन्यसाधारण माहात्म्य मानले जाते. कृष्णाच्या हयातीतच त्याला परमेश्वराची विभूती मानणाऱ्यांचा एक वर्ग निर्माण झाला असावा असे महाभारतातील काही उल्लेखांवरून वाटते. वासुदेवाचे वाढलेले विभूतिमत्व व त्याची होणारी पूजा यांचा अभिलाष धरून तसेच आपले माहात्म्य माजविणारा दुसरा एक तोतया वासुदेव उपटल्याचा उल्लेख महाभारतात आहे.

गीतेच्या पुढच्या जवळ जवळ सर्व अध्यायांवर कृष्णभक्तीची दाट छाया पडलेली आढळून येते. म्हणून येथे त्या संप्रदायाच्या स्वरूपासंबंधी थोडक्यात परिचय करून देणे आवश्यक वाटते. भागवतपुराणाच्या ११ व्या स्कंधाच्या २९ व्या अध्यायात जगाचा निरोप घेण्याच्या वेळी कृष्णाने उद्धवाला जो उपदेश केला त्यात "मर्त्य मनुष्य ज्यायोगे दुर्जय मृत्यूवर मात करू शकतो ते माझे सुमंगल धर्म तुला सांगतो" असे म्हणून जे सांगितले त्यांतील काही महत्त्वाचे श्लोक पुढीलप्रमाणे :

कुर्यात् सर्वाणि कर्माणि यदर्थं शनकैः स्मरन् ।
मय्यर्पित मनश्चित्तो मद्धर्मात्यमनोरतिः ॥ ९ ॥
देशान्पुण्यानाश्रयेत मद्भक्तैः साधुभिः श्रितान् ।
देवासुरमनुष्येषु मद्भक्ताचरितानि च ॥ १० ॥
मामेव सर्वभूतेषु बहिरन्तरपावृतम् ।
ईक्षतात्मनि चात्मानं यथा खममलाशयः ॥ १२ ॥
ब्राह्मणे पुल्कसे स्तेने ब्रह्मण्येऽर्के स्फुलिङ्गके ।
अक्रूरे क्रूरके चैव समदृक् पण्डितो मतः ॥ १४ ॥
विसृज्य स्मयमानान् स्वान् दृशं व्रीडां च दैहिकीम् ।
प्रणमेद्दंडवद्भूमावाश्वचाण्डालगोखरम् ॥ १६ ॥
यावत्सर्वेषु भूतेषु मद्भावो नोपजायते ।
तावदेवमुपासीत वाङ्मनः कायवृत्तिभिः ॥ १७ ॥
अयं हि सर्वकल्पानां सध्रीचीनो मतोमम ।
मद्भावः सर्वभूतेषु मनोवाक्कायवृत्तिभिः ॥ १९ ॥
यो यो मयि परे धर्मः कल्प्यते निष्फलायचेत् ।
तदायासो निरर्थः स्याद्भयादेरिव सत्तम ॥ २१ ॥
एष तेऽभिहितः कृत्स्नो ब्रह्मवादस्य संग्रहः ।
समासव्यासविधिना देवानामपि दुर्गमः ॥ २३ ॥

(हळू हळू माझे स्मरण करीत सर्व कर्मे माझ्याप्रीत्यर्थ करावीत. माझ्या ठायी मन आणि चित्त अर्पण करून मी सांगितलेल्या धर्मावर मनापासून प्रेम करावे. सज्जनांचे वास्तव्य असलेल्या पुण्यप्रदेशांचा माझ्या भक्तांनी आश्रय घ्यावा, देव-असुर-मनुष्ये यांमध्ये असणाऱ्या माझ्या भक्तांच्या आचारांचा आसरा घ्यावा. सर्व भूतांमध्ये अंतर्बाह्य व्यापलेल्या मला स्वतःमध्ये आत्म्याच्या रूपाने पाहावे. ब्राह्मण, चांडाल, ताडवृक्ष वा रुई, दयावान् वा क्रूर या सर्वांना समदृष्टीने पाहतो तो शहाणा होय. आपले ताठरपणाचे भाव टाकून देऊन, देहामुळे निर्माण झालेली लाज सोडून, अश्व, चांडाल, गाय, गाढव यांच्यापुढे दंडवत् प्रणाम करावा. जोवर सर्व भूतांविषयी भगवत्स्वरूपाचा भाव उत्पन्न होत नाही तोवर अशाच रीतीने कायावाचामने करून उपासना करावी. सर्व भूतांविषयी कायावाचामनोवृत्तींनी सर्वत्र भगवत्स्वरूपाचा भाव निर्माण होणे हाच सर्व आचारांचा स्थायीभाव आहे असे माझे मत आहे. हा सारा ब्रह्मवाद तुला मी एकत्रपणे व पृथक्पणे सांगितला जो देवांनाही आचरण्याला कठीण आहे).

भागवतधर्माचे स्वरूप शंकराचार्यांनी आपल्या वेदान्तसूत्रांवरील भाष्यात अ. २, पाद २, सूत्र ४२ यावर स्पष्टीकरण करताना पुढीलप्रमाणे दिले आहे :

"तत्र भागवता मन्यन्ते। भगवानेवैको वासुदेवो निरंजन ज्ञानस्वरूपः परमार्थतत्त्वं स चतुर्धाऽऽत्मानं प्रविभज्य प्रतिष्ठितो वासुदेवव्यूहरूपेण संकर्षणव्यूहरूपेण प्रद्युम्नव्यूहरूपेण अनिरुद्धव्यूहरूपेण च। वासुदेवो नाम परमात्मा उच्यते। संकर्षणो नाम जीवः। प्रद्युम्नो नाम मनः। अनिरुद्धो नामाहंकारः। तेषां वासुदेवः परा प्रकृतिः इतरे संकर्षणादयः कार्यम्। तमित्थंभूतं परमेश्वरं भगवन्तमभिगमनोपादानेज्या स्वाध्याययोगैर्वर्षशतमिष्ट्वा क्षीणक्लेशो भगवन्तमेव प्रतिपद्यत इति।" (यासंबंधी भागवतसांप्रदायी असे मानतात

की, एक वासुदेव हाच भगवान. तो निष्कलंक, ज्ञानस्वरूप असे परमार्थतत्त्व होय. तो स्वतःचे चार प्रकारांत विभाजन करून राहिलेला आहे. ते चार प्रकार म्हणजे– वासुदेवव्यूह, संकर्षणव्यूह, प्रद्युम्नव्यूह आणि अनिरुद्धव्यूह. वासुदेव हा परमात्मा म्हटला आहे. संकर्षण म्हणजे जीव. प्रद्युम्न म्हणजे मन. अनिरुद्ध म्हणजे अहंकार. त्यांमध्ये वासुदेव ही सर्वश्रेष्ठ मूलवस्तू बाकीचे संकर्षणादी त्याची निष्पत्ती. जीव हा एवंगुणविशिष्ट भगवान् परमेश्वरापाशी जाऊन, बाह्य वस्तूतून इंद्रिय–मन–बुद्धी काढून घेऊन यज्ञ–स्वाध्याय–योग यांनी शंभर वर्षे त्याची उपासना करून दुःखमुक्त होतो आणि भगवंतालाच जाऊन मिळतो).

वासुदेव भगवान अर्थात श्रीकृष्ण हाच परमेश्वर. जिवाचे मूळ रूप तो आहे, त्याला शरण जाण्याने त्याच्यातच मृत्यूनंतर जीव प्रवेश करतो, भक्ताने अहंकाराचा पूर्ण त्याग करून शून्य होणे अवश्य आहे. सर्व भूतांत वासुदेवाला पाहण्याची सिद्धी ही अंतिम सिद्धी आहे, हे या भागवतधर्माचे तात्पर्य आहे. महाभारतात याला ' नारायणीय धर्म ' असेही नाव आहे. सर्व भूतमात्रांशी एकरूपता–समभाव हा भागवतधर्माचा विशेष आहे. म्हणूनच भागवतसांप्रदायात–वैष्णवात–अहिंसेला अतिशय प्राधान्य आहे.

चौथ्या अध्यायाच्या प्रारंभीच भगवान श्रीकृष्ण धर्मसंस्थापना व दुष्टांचे दमन यांकरिता युगायुगांमध्ये अवतार घेऊन येतो असे सांगण्यात, चातुर्वर्ण्याची विस्कटलेली घडी पुन्हा बसविणे हे त्याचे कार्य आहे, असे सूचित करण्याचा हेतू आहे असे मला वाटते. अन्यथा, कर्मयोगाच्या अनुषंगाने येणाऱ्या चातुर्वर्ण्याचा निर्देश अवतारकृत्याशी जोडण्याचे काही प्रयोजनच नव्हते. ही वर्णव्यवस्था कायम राहिली तरच अनासक्त होऊन कर्मयोग आचरणे सुगम होते. जर वर्णसंकर झाला तर, म्हणजे वर्णव्यवस्था झुगारून देऊन कोणीही मनाला येईल त्या वर्णाचा आचार करू लागला तर, समाज अस्तव्यस्त होतो, समाजात परस्परद्रोह निर्माण होतो, त्यामुळे अस्थैर्य आणि अशांती माजते आणि मग कर्मकलहातून नैष्कर्म्यसिद्धी दूरच राहते. अवतारनिर्देशाचा संबंध चातुर्वर्ण्य पुन्हा प्रस्थापित करण्याशी नसेल तर अवतारनिर्देश, अवतारकार्याविषयीच्या ज्ञानाचा निर्देश (४.९) आणि पुढचे १०, ११ व १२ हे श्लोक यांचा एकमेकांशी मेळच बसणार नाही. कोणत्या विचारसंगतीला धरून ५ ते १२ हे श्लोक येतात, त्यांचा एकमेकाशी अनुबंध काय हे अन्यथा गूढच राहते. अवताराचा उल्लेख चातुर्वर्ण्यव्यवस्था कायम राखण्याच्या संदर्भात १३ व्या श्लोकात केल्यानंतर परत कर्मयोगाच्या विवेचनाकडे प्रतिपादन वळलेले दिसून येते. विनोबांनी गीताईमध्ये या अध्यायांच्या विषयांचे जे ९ भाग पाडले आहेत त्यांत हा अवतारवादाचा स्वतंत्र विषय ( १० ते १२ ), चातुर्वर्ण्याचा स्वतंत्र विषय (१३ ते १५) आणि पुढे कर्मयोगाचा स्वतंत्र विषय (श्लो. ४ ते ९), अवताराच्या भक्तीचा स्वतंत्र विषय, अशी विभागणी केली आहे. या विभागणीमागील त्यांचा विचार काय तो प्रश्न अलग. पण असे स्वतंत्र विषय या अध्यायात आल्याचे त्यांनाही जाणवले होते. हे मला लक्षात आणून द्यायचे आहे.

भक्तियोगाची अथवा भागवतसांप्रदायाची छाया गीतेच्या अध्यायांवर येथून पुढे कशी पडत गेली आहे हे समजून येण्यासाठी भागवतसांप्रदायाची तत्त्वे समजून येणे आवश्यक म्हणून येथे दिली.

कर्मयोग आचरताना वर्णविहित कर्म, वर्णविरुद्ध कर्म म्हणजे विकर्म आणि अकर्म म्हणजे कर्मत्याग अशा कर्मांच्या प्रकारांचा उल्लेख या अध्यायात करण्यात आला आहे. पण प्रत्यक्ष विवेचनात फक्त ' अकर्मा ' विषयीचेच स्पष्टीकरण (श्लो. २०–२३) केलेले आहे. कर्मात अकर्म कसे ते येथे उलगडून सांगितले आहे पण अकर्मात कर्म कसे साधायचे त्याचा मात्र उलगडा केलेला नाही. मला वाटते त्याचे कारण कर्मयोगाचा तो विषय नाही असे मानले असावे. ' अकर्म ' म्हणजे कर्म न करणे. कर्म करूनही अकर्म साधते ते कर्मसंकल्पाचा त्याग व कर्मफलाविषयी अनासक्ती ठेवल्याने. तो कर्मयोग. चातुर्वर्ण्यानुसार प्राप्तकर्म न करणे हे आत्मज्ञानात मनुष्य स्थिर झाला म्हणजे साधते. आत्मज्ञान्याला वर्णानुसार कर्मे करण्याचे बंधनच लागू होत नाही, कारण शेवटी अनासक्त बुद्धीने कर्म करून जे साधावयाचे ते आत्मज्ञानी पुरुषाने साधलेले असल्याने तो ती कर्मे न करता, म्हणजे अकर्मी राहूनही, कर्मे केल्याचे साध्य साधतो.

या रीतीने, मी वर म्हटल्याप्रमाणे, या ४ थ्या अध्यायात कर्मयोगाबरोबर आत्मज्ञानयोगाचे म्हणजेच बुद्धियोगाचेही समर्थन केलेले आढळून येते. याच कारणाने ' यज्ञा 'ची व्याप्ती, अनेक यज्ञप्रकार अग्नि-






विरहित असलेले सांगून, या अध्यायात वाढविण्यात आली आहे. किंबहुना, कर्मयोगाचे पर्यवसान शेवटी ज्ञानयोगात होते किंवा झाले पाहिजे असेच या अध्यायाचे विशिष्ट तात्पर्य आहे. श्लोक ३२ ते ४१ हेच सांगतात. स्वाध्याय-ज्ञानोपासना याला यज्ञाचेच महत्त्व येथे दिले आहे.

आणखी एक लक्षात घेण्याजोगी गोष्ट या अध्यायात आढळते. पहिल्या ३ श्लोकांत 'हा योग मी पूर्वी विवस्वानाला सांगितला होता, त्याने मनूला, मनूने इक्ष्वाकूला अशा परंपरेने तो राजर्षींना माहीत झालेला होता, पण पुढे जसा काळ गेला तसा हा योग नष्ट झाला ( म्हणजे आचारात येईनासा झाला ) ' असे कृष्णाच्या तोंडी वाक्य घातले आहे. राजर्षी कोणाला म्हणायचे ? अनासक्तिपूर्वक क्षत्रियवर्णाचे राज्यकारभाराचे कर्म आचरणारे ते. काळ गेला तसे राजेलोक अनासक्तिपूर्वक क्षत्रियकर्म आचरीतनासे झाले आणि म्हणून हा योग नष्ट झाला असे येथे म्हटले आहे. कर्मयोग क्षत्रिय राजांनी आचरला नाही म्हणून नष्ट का व्हावा ? या सबंध काळात महर्षी. ब्रह्मर्षी नव्हते काय ? होते असे रामायण–महाभारतादी ग्रंथांत दिसून येते. महाभारताच्या शांतिपर्वात तर अशा अनेक महर्षींचे उल्लेख आलेले आहेत. मग कर्मयोगाचा आचार नष्ट झाला असे उद्‌गार येथे का आले ? माझ्या मताने कर्मयोग हा क्षत्रियांशी संबधित असलेला आचारधर्म मानलेला होता ब्राह्मणांचा आचारधर्म ज्ञानयोग अथवा बुद्धियोग. आणि पूर्वी आपण बुद्धियोग = कर्मयोग + समाधियोग हे समीकरण असल्याचे पाहिले आहे. तेव्हा कर्मयोग क्षत्रियांनीच आचरायचा धर्म मानलेला असला पाहिजे. २ ऱ्या अध्यायाची चिकित्सा करताना त्यातील श्लोक ११ ते ३८ हे क्षत्रिय अर्जुनाला शोभणारे असेच कसे आहेत ते आपण पाहिले आहे. त्या श्लोकात शरीर नश्वर, आत्मा अमर म्हणून कर्तव्यकर्म करीत असता शरीर गेल्याचा वृथा शोक न मानता क्षत्रियाने समबुद्धी ठेवून स्वधर्म आचरला पाहिजे असे केलेले प्रतिपादन हे क्षत्रियाने पाळावयाच्या कर्मयोगाच्या आचाराचे प्रतिपादन आहे.

क्षत्रियाचा कर्मयोग आणि ब्राह्मणाचा बुद्धियोग हे उभयतांचे स्वधर्म. प्रत्येकाने आपापला स्वधर्म पाळावा. तो उणा वाटत असला तरी तोच पाळणे हितकर, परधर्माचे पालन घातक, असेही ३ ऱ्या अध्यायात ( श्लो. ३.३५ ) आणि 'विकर्म' म्हणजे विरुद्ध कर्म संबोधून ४ थ्या अध्यायात ( ४.१७ ) स्पष्टपणे सांगितले आहे.

'विकर्म' या शब्दाचा अर्थ 'गीतारहस्य'-कारांनी 'विपरीत कर्म' असा केला आहे. कर्माच्या अंतिम परिणामाच्या दृष्टीने ज्या कर्माचे अशुभ परिणाम घडतात ते 'विकर्म' असे त्यांनी म्हटले आहे. विनोबा 'विकर्म' म्हणजे 'विशेष कर्म' म्हणतात. "कर्म म्हणजे बाहेरची स्वधर्माचरणाची स्थूल क्रिया. या बाहेरच्या कर्मात चित्त ओतणे म्हणजेच विकर्म" अशी त्यांनी व्याख्या केली आहे. गांधीजी 'विकर्मा'चा अर्थ 'निषिद्ध कर्म' असा करतात. ज्ञानदेव "मग वर्णाश्रमासि उचित । जे विशेष कर्म विहित । तेही वोळखावे निश्चित । उपयोगेसि ॥" असे सांगतात. भागवत स्कंध ११, अ. ३ मध्ये राजा-अविर्होत्रऋषि-संवादात अविर्होत्र सांगतात : "नाचरेद्यस्तु वेदोक्तं स्वयमज्ञोऽजितेन्द्रियः । विकर्मणाह्यधर्मेण मृत्योर्मृत्युमुपैति सः ॥" ( जो स्वतः अज्ञ आणि असंयमी राहून वेदात सांगितलेला आचार करीत नाही तो त्या अधर्मयुक्त विकर्माने मृत्यूकडून मृत्यूकडे जातो ). म्हणजे वेदोक्त कर्म न आचरणारा तो अधर्मी विकर्मी म्हटला आहे. आणि हाच अर्थ मला बरोबर वाटतो. 'विकर्म' म्हणजे 'वर्णविरुद्ध कर्म' 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' या संदर्भात हा अर्थ बरोबर बसतो. वर्णाश्रमधर्मानुसार आलेली आपली कर्मे न सोडता करीत राहणे व त्या कर्मांच्या फळांचा मनाने त्याग करणे हा कर्मयोग. वर्णधर्मानुसार आलेली कर्मे सोडण्याला मनुष्य का व केव्हा प्रवृत्त होतो ? काही अभिलाषा प्रलोभन वाटू लागले म्हणजे. आणि अभिलाषा होणे म्हणजे रजोगुणाने पछाडला जाऊन कर्मबंधात जखडले जाणे. ते विकर्म. याकरिताच सहज आपल्या वाट्याला आलेले कर्म माणसाने न टाकण्यात त्याचे अंतिम श्रेय आहे असे या दोन्ही अध्यायांत प्रतिपादन आहे.

कर्म करीत राहिल्याने कर्माचा बंध कसा सुटेल, कर्मे टाकल्यानेच तो सुटणार असा संशय मनात बाळगून कर्मयोगाविषयी श्रद्धा न ठेवणारा तो संशयात्मा. अशाला या लोकीही सुख लाभत नाही आणि परलोकीही नाही. कर्मयोगानेच कर्माचा बंध सुटतो या ज्ञानाने निःसंशय होऊन जो आत्मज्ञानी झाला त्याला कर्मे बांधत नाहीत, असे या अध्यायाच्या शेवटी ठामपणाने सांगून कर्मयोगाची व ज्ञानयोगाची सांगड घालण्यात आली आहे.

( अपूर्ण )












# इब्सेनी–स्त्री-चित्रे

अनिरुद्ध कुलकर्णी

सार्‍याच स्त्रिया त्याच्या प्रेमात पडल्या आहेत.
–ॲन शार्लोत् लेफ्लर

– १ –

अतिशय उत्कृष्ट आणि जिवंत स्त्री-व्यक्तिरेखा निर्माण करणारा श्रेष्ठ नाटककार म्हणून इब्सेन सुप्रसिद्ध आहे. आधुनिक साहित्यिकांत या बाबतीत त्याच्या आसपास पोहोचू शकणारे साहित्यिक फार नाहीत. महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याच्या स्त्री-व्यक्तिरेखा खुद्द स्त्रियांनाही मनापासून आवडत. पटतही असत. तो स्त्रियांचा लाडका लेखक होता. तत्कालीन प्रसिद्ध स्त्री-कादबरीकार ॲन शार्लोत् लेफ्लर हिने इब्सेन स्त्रियांचा कसा आवडता होता याचे रसभरित वर्णन तिच्या पत्रांतून केले आहे.[१] आजही इब्सेनच्या स्त्री-व्यक्तिरेखा स्त्रियांना आवडतात. आणि विशेष म्हणजे त्या कालबाह्य न वाटता त्यांचा जिवंतपणा, टवटवी, हृद्य वाटते. हा विषय असा आहे की, इब्सेनच्या स्वतःच्या आयुष्यात कोणकोणत्या स्त्रिया कशा कशा तऱ्हेने आल्या ही माहितीही उद्बोधक ठरू शकते. त्याच्या प्रत्यक्ष जीवनातील काही स्त्रियांचे स्थान व आकलन आणि त्याच्या नाट्यसृष्टीतील स्त्रियांची व्यक्तिचित्रे यांची तुलना करून पाहता येते.

इब्सेनची आई मार्केन (Marichen) दिसायला सुंदर होती. तिला बालपणी चित्रे काढण्याचा नाद होता. आणि खास म्हणजे ती नाट्यवेडी होती. तिचा नवरा नूद इब्सेन हा श्रीमंत व्यापारी होता; पण आयुष्याच्या ऐन उमेदीतच त्याचे दिवाळे वाजले आणि तो अकाली मरणही पावला. पुढे पाच मुलांचा संसार मार्केनला कसाबसा ढकलावा लागला. आनंदी व सुखी मार्केनचे, उदास, चिंताग्रस्त स्त्रीत रूपांतर झाले. यात भर म्हणून हेन्रिक हा मार्केनचा मुलगा नूद इब्सेनचा मुलगा नसून तोरमोद नूदसेन ह्या मार्केनच्या वयस्क चाहत्याचा होता ही वदंता मायलेकांना सतावत राहिली. लग्नाआधी तोरमोद आणि मार्केन यांचे संबंध होते, असे मानले जाई. खरे-खोटे परमेश्वर जाणे. इब्सेनला चार भावंडे होती. पैकी सर्वांत लहान भावंड हेडविग् ही मुलगी होती. हेडविग् आणि इतर भावंडे यांचे इब्सेनशी पुढे दूरचे संबंध राहिले. हेडविग्ने श्रीमंत स्थळ पटकावून कुटुंबाला मदत करण्याचा प्रयत्न केला. इब्सेनची आई दीर्घकाळ जगली नाही.

ग्रिमस्टाड् गावात विद्यापीठीय शिक्षण घेत असताना हेन्रिक औषधे करण्याच्या दुकानात काम करीत असे. या वेळी एक दुर्दैवी प्रसंग घडला. इब्सेन राही तेथे बाहेरच्या खोलीत दोन नोकराणीवजा स्त्रिया राहात. त्यांतील सोफी एल्झअ् येनसेन ह्या अठ्ठावीस वर्षीय तरुणीच्या मोहपाशात इब्सेन सापडला व तिला दिवस गेले. हे प्रकरण दडपण्यासाठी तिला तिच्या मूळ गावी पोबारा करावा लागला. सोफीला मुलगा झाला. हेन्रिकला पुढे बारा वर्षे तिला पोटगी द्यावी लागली. ही घटना आयुष्यभर इब्सेनला पोखरत राहिली.

ऐन तारुण्यात इब्सेनला दोन असफल प्रेमाचे अनुभव आले. ग्रिमस्टाड येथे तो क्लारा एबेल नावाच्या तरुणीच्या प्रेमात पडला. या वेळी तो 'कॅटिलीना' हे ऐतिहासिक नाटक लिहीत होता. पण इब्सेनचे नास्तिक व क्रांतिकारक समाजवादी विचार धर्मभोळ्या, सनातनी वातावरणात वाढलेल्या क्लाराला आवडले नाहीत. तिने प्रतिसाद आखडता घेतला. इब्सेनने तिच्यावर केलेल्या त्या वेळच्या कवितांपैकी "तारकेस" आणि "नृत्याच्या आठवणी" या दोन मिळतात. दुसरा प्रेमभंग बेर्गेन शहरात इब्सेन 'स्टेज मॅनेजर' म्हणून काम करीत असताना झाला. रिक्कअ होल्स्ट ही पंधरा वर्षांची कोवळी तरुणी आणि पंचविशीतील इब्सेन यांचे प्रेम जमले. रिक्कअ आनंदी, बहिर्मुख होती. दोघांनी एकनिष्ठ राहण्याच्या आणाभाका घेतल्या आणि दोघांच्या अंगठ्या एकत्र बांधून समुद्रात फेकल्या. इब्सेनने रिक्कअवर काही कविता केल्या. त्यांपैकी






'रानफुले व कुंडयांतील झाडे' ही उपलब्ध आहे. इब्सेनने रिक्क्अच्या वडिलांजवळ लग्नाचा विषय काढला तेव्हा ते भडकले व त्याच्या अंगावर धावून गेले. घाबरलेल्या हेन्रिकने चक्क पळ काढला. मॅट्रिकमध्ये नापास झालेल्या गरिबाला कोण आपली मुलगी देणार! रिक्क्अचे पुढे श्रीमंत व्यापाऱ्याशी लग्न झाले. तीस वर्षांनंतर विख्यात इब्सेनने बेर्गेनला परत भेट दिली तेव्हा तो आवर्जून रिक्क्अला भेटला. पुढे 'लव्हज् कॉमेडी'त या प्रकरणाचे प्रतिबिंब उमटले आहे.

बेर्गेनमध्ये इब्सेन नाटककार म्हणून उदयाला आला. त्याचे 'फीस्ट अॅट सोलहूग' गाजले. गावात माग्दालेना थोरेसन नावाची, प्रतिष्ठित साहित्यप्रेमी स्त्री होती. ती इब्सेनवर खूष होती. तिने त्याला घरी जेवायला बोलाविले. तिचे पतिराज धर्मगुरू होते. त्यांना पहिल्या पत्नीपासून चार मुली होत्या. माग्दालेना थोरेसन ही त्यांची दुसरी पत्नी. पहिली वारलेली होती.

थोरेसन कुटुंबाचा इब्सेन लवकरच जवळचा स्नेही झाला. सुझाना थोरेसन व मारी थोरेसन या देखण्या बहिणी होत्या. सुझानाला वाङ्मयाची, विशेषतः नाटकांची फारच आवड होती. पुस्तकातला ती किडाच होती. कुठलाही क्षुद्रपणा तिला खपत नसे. हेन्रिक व सुझाना एकमेकांना अगदी योग्य होते हे अनेकांचे मत झाले. सुझाना सुंदर नव्हती पण आकर्षक होती. तिचे टपोरे, बोलके डोळे आणि अप्रतिम, लांबसडक केशसंभार ह्यांची कोणावरही छाप पडे. दुहेरी हाडाची, सशक्त सुझाना पुरुषी थाटाची असली तरी यौवनाने मुसमुसलेली होती. तिचे विचार तिच्या सावत्र आईप्रमाणेच पूर्ण पुरोगामी होते. इब्सेनचे व तिचे चांगलेच जुळले व प्रेमाची परिणती विवाहात झाली. पुढे सुझाना आणि तिच्यापेक्षा वीस वर्षांनी तरुण असलेला इब्सेनचा मित्र तत्कालीन विख्यात समीक्षक-विचारवंत ब्रान्दीस यांचे 'प्रकरण' असल्याचे बोलले जाई. सुझानाला तरुणांचा सहवास फार आवडे पण ब्रान्दीसशी तिचा फार जवळचा संबंध नसावा हेच रास्त मत मानले जाते. इब्सेनपासून सुझानाला फक्त एक मुलगा झाला. पुढे तिने अपत्यच होऊ दिले नाही. इब्सेन व तिच्यातील पत्रव्यवहार, वृद्धत्वाकडे झुकताना तिने पूर्णपणे नष्ट केला. सुझाना खंबीर मनाची, कष्टाळू व काटकसरी स्त्री होती.

इब्सेन नाटककार होता. त्याच्याभोवती प्रसिद्धीचे झगझगीत वलयही होते. पण नटयांचा सहवास, संबंध इब्सेन शक्यतो टाळी. डॅनिश दिग्दर्शक-नाटककार हायबर्ग याची अभिनेत्री पत्नी योहान्नीस हिचा मात्र इब्सेन चाहता होता. तिच्यावर त्याने केलेली एक दीर्घकविता उपलब्ध आहे. सौ. हायबर्ग ही इब्सेनला आदर्श नटी व प्रेरणा देणारी देवताच वाटे. रोममध्ये असताना हेन्रिकचा लीना ब्रून हिच्याशी घनिष्ठ स्नेहसंबंध जुळला. लीनाला तीन मुले होती. पैकी पीटर व थेआ टी. बी. ने वारली. ख्रिस्तोफर या मुलाशी मात्र इब्सेनची जीवनभरची मैत्री जमली. ब्रान्दची व्यक्तिरेखा निश्चितपणे ख्रिस्तोफर ब्रूनवरून घेतली गेली. लीनाचे इब्सेनविषयी प्रथम प्रतिकूल मत होते. पण सहवासाने ते दुसऱ्या टोकाला गेले. लीना विधवा होती. ती व इब्सेन एकमेकांच्या खूपच जवळ आले व ही मैत्री टिकावू ठरली.

कामिला कोलेत, लॉरा कीलर आणि अॅन शार्लोत् लेफ्लर या तीन लेखिकांशी इब्सेनचे निकटवर्ती संबंध आले. या तीनही पुरोगामी विचाराच्या आधुनिक स्त्रिया होत्या. लॉरा कीलरवरून नोराची व्यक्तिरेखा घेतली गेली हे तर प्रसिद्धच होते. अॅन शार्लोतबरोबर इब्सेनने बोटीने प्रवासही केला होता. ती इब्सेनची विलक्षण चाहाती होती. प्रवासास सुरुवात करताना 'हनीमून' हा शब्द वापरल्याने अॅन शार्लोत् बुचकळयात पडली होती. अॅन शार्लोत् स्त्री-मुक्तिवादी होती व ऑस्कर वाईल्ड, एलिनॉर मार्क्स, अॅनी बेझंट अशांसारख्यांशी तिचा चांगलाच परिचय होता. या स्नेहसंबंधाची व प्रवासाची परिणती प्रेमसंबंधाप्रत गेली. आणि थांबली. लेफ्लरबाईंची अपेक्षा पुरी झाली नसावी असेही असेल.

वयस्कर इब्सेनला विशीतल्या तरुणींची मैत्री आवडे. अनेक अननुभवी, साहित्यप्रेमी तरुण मुली इब्सेनसाठी जीव टाकीत. इब्सेनचे व्यक्तिमत्त्व छाप पाडणारे व भोवती जागतिक कीर्तीचे वलय. बऱ्याच मुलींना ते भुरळ पाडी. अशा मुलींत हिल्डूर अँडरसन, एमिली बार्डाख आणि हेलन राफ ह्यांच्याबरोबर इब्सेनचे संबंध फार जवळचे आले. केवळ उतारवयातील फ्लर्टिंग म्हणून ते झटकून टाकता येण्यापलीकडचे दिसतात.

जर्मनीतील किनाऱ्यावरील गोसेनसास या गावात इब्सेनला अठरा वर्षांची एमिली बार्डाख भेटली. इब्सेन साठीकडे जात होता. दोघे एकमेकांच्या प्रेमात पडले आणि एकमेकांसाठी वेडे झाले. एमिली ऑस्ट्रियन होती व जर्मन बोले; पण भाषा आड आली नाही. इब्सेनला मोडकेतोडके जर्मन येई. एमिली 'मास्टर बिल्डर'-मधील हिल्डाचे मॉडेल ठरली.

एमिली डायरी ठेवीत असे आणि इब्सेन–एमिली-मधील पत्रव्यवहार उपलब्ध आहे. त्यावरून इब्सेन तरुण मुलींशी कसे उत्कट आणि जिव्हाळ्याचे संबंध ठेवी हे कळून येते. एके ठिकाणी पत्रात एमिलीला 'तू मला मुलीसारखी आहेस' असेही त्याने म्हटले आहे. एमिली–इब्सेनसंबंध या थराला गेले, की इब्सेन सुझानाला घटस्फोट देणार असे बोलले जाऊ लागले. पुढे इब्सेन म्युनिचला गेल्यावर त्यानेहून पत्रव्यवहार बंद केला. हेलेन राफशी मैत्री यानंतर लगोलगची आहे. हेलेन राफने आपले संबंध वैषयिक नसत असे पुढे लिहिलेल्या आठवणींच्या पुस्तकात म्हटले आहे. हेलन राफ जर्मन चित्रकार होती. दोघांमध्ये स्त्रीची इच्छाशक्ती व हिप्नॉसिसवर बोलणे होई. हेलन राफही डायरी ठेवी. हिल्डूर ॲण्डरसन (पूर्वाश्रमीची हिल्डूर झोंटुम) ही तरुणी अशीच इब्सेनच्या आकर्षण-झोतात पुढे सापडली आणि दोघांचे खूप जवळचे संबंध आले. ऑस्लोत या संबंधांची चर्चा नागरिक चवीने करीत. हिल्डूरही बार्डाख व राफ यांप्रमाणे पुढे दीर्घायुष्य जगली व तिनेही आपल्या आठवणी लिहिल्या आहेत.

इब्सेनच्या निकट सहवासात आलेल्या ह्या काही ठळक स्त्रिया. बहुतेक सर्वांनी आठवणी लिहून आपण इब्सेनच्या किती जवळ होतो हे दाखविले आहे. ह्यांत इब्सेनच्या सासूबाई माग्दालेना थोरेसन आणि सुनबाई बर्ग्लियट् ब्योर्नसन ह्यादेखील आहेत. इब्सेन स्त्रियांशी अतिशय जवळचे, जिव्हाळ्याचे, प्रेमाचे संबंध ठेवी पण त्यांचे पर्यवसान लैंगिक संबंधात होत नसे असे सर्वसाधारणपणे मानले जाते. इब्सेनचा चाहाता, समीक्षक व स्नेही गेऑर्ग ब्रान्दीस याचे मत असेच दिसते. इब्सेन सुरुवातीस स्त्रीमुक्तिवादी नव्हता आणि पिंडानेही स्त्रीसारखा मृदू नव्हता, इब्सेन पुरुषीच होता आणि उत्तरोत्तर इब्सेनची स्त्रियांविषयीची गौरवपूर्ण सहानुभूती निश्चितच वाढत गेली, असा त्याचा अभिप्राय आहे.

इब्सेनच्या लैंगिक भित्रेपणाविषयी, म्हणजे आपल्याकडील भाषेत "चारित्र्या" विषयी अर्थातच् खल झालेला आहे. लैंगिक संबंध इब्सेन का टाळीत असावा यासंबंधी दिली गेलेली स्पष्टीकरणे विस्ताराने पाहण्याचे कारण नाही. डॉ. एडवर्ड बुल हा इब्सेनचा डॉक्टर होता. वैद्यकीय तपासणीच्या वेळी इब्सेन खळखळ करी या घटनेचा आधार घेऊन इब्सेन शारीरिक संबंधच ठेवायला असमर्थ असावा असेही मानण्यापर्यंत काहींनी मजल गाठलेली आहे. चरित्रकार मायरच्या मते ही शोकान्तिका इब्सेनच्या वाट्याला आली असण्याची शक्यता आहे. सोलनेस, बोर्कमान व रूबेक हे तीनही नायक जणू इब्सेनची आत्मचित्रे आहेत आणि तिघेहीजण लैंगिकदृष्ट्या दुर्बल दिसतात. (लिट्ल् इयोल्फमधील आल्मर्सदेखील असाच आहे.) ही घटना मायर महत्त्वाची मानतो. एकंदरीत इब्सेनने 'चारित्र्य कसे टिकविले' याचे आपल्याकडील मंडळींना कौतुक वाटेल तर फ्रेंच किंवा अमेरिकन मंडळींना सखेद आश्चर्य वाटेल.

मध्यम उंचीचा इब्सेन अगदी देखणा नसला तरी रुबाबदार होता. त्याची राहाणी अत्यंत स्वच्छ आणि टापटिपीची असे. कपडे व्यवस्थित असत. त्याला स्त्रियांशी वागण्याची नॅक होती. संभाषण, आदराची वागणूक, पत्रे, छोट्या भेटवस्तू यांच्या वापराने तो स्त्रियांचा विश्वास व प्रेम संपादन करी. इब्सेनची पत्नी सुझाना पुरुषी होती व पुढे दोघांत आकर्षण असे उरलेच नव्हते. फक्त कृती करण्याचे धाडस नसल्याने इब्सेन घटस्फोट घेत नव्हता असे स्त्रियांमध्ये मानले जाई. इब्सेनला अफाट आंतरराष्ट्रीय कीर्ती मिळाली होती आणि त्याची आर्थिक स्थितीही पुढे नेहमीच बळकट राहिली. इब्सेनच्या मागे पोरांचे लेंढार नव्हते. एकुलता एक, यशस्वी मुलगा सिगुर्द हा तेवढा होता. इब्सेन 'स्त्रीवादी' चळवळीत नव्हता तरी त्यांच्या विचारांना त्याचा बहुतेक पाठिंबा असे ही गोष्ट सुपरिचित झाली होती. या सर्वांचा परिणाम इब्सेन स्त्रियांमध्ये विलक्षण लोकप्रिय होण्यात झाला. इब्सेन सार्वजनिक सभा, सम्मेलने कटाक्षाने टाळी: पण जेव्हा वेळ येई तेव्हा ताबडतोब स्त्रियांचा गराडा त्याच्याभोवती पडल्यावाचून राहात नसे. आणि यातील काही तरुणी वा स्त्रिया परिचय वाढविण्याचीही पुढे खटपट करीत असत.

हे सर्व लक्षात घेण्याचे कारण असे की, सुरुवातीच्या विपन्नावस्थेत जरी स्त्रियांविषयी कडवटपणे लिहिण्यास प्रवृत्त करतील असे अनुभव त्याच्या वाट्याला आले तरी लग्नानंतर मात्र इब्सेनचे भाग्य एकदमच उजळलेले दिसते. स्त्रियांविषयी जिव्हाळ्याने आणि आदरभावाने लिहावे असे अनेक अनुभव त्याला उत्तरोत्तर आलेले दिसतात. बहिणीविषयीचे हृद्य संबंध किंवा मुलींचे हळुवार चित्रण इब्सेनच्या नाट्यसृष्टीत फारसे दिसत नाही याचे कारण खुद्द त्याच्या जीवनातच आहे हे दिसून येते. साहित्यातील प्रत्येक व्यक्तिचित्रणाची प्रत्यक्ष जीवनातील मॉडेल्स वा मुळे हुडकून काढण्याचा खटाटोप वाङ्मयीन आकलनाला अनिवार्यपणे आवश्यक नसतो. पण अशा प्रकारचे संदर्भ वाङ्मयीन आकलनात बिघाड उत्पन्न करतात असेच मानण्याचे कारण नाही.

— २ —

तरुण वयातील इब्सेनने ज्या स्त्री-व्यक्तिरेखा निर्माण केलेल्या आहेत त्या रोमॅन्टिक धर्तीच्या आहेत. एकोणिसाव्या शतकाचा पूर्वार्ध ज्या प्रकारच्या स्त्री-रेखांत रुची घेत असे त्या प्रकारच्या ह्या व्यक्तिरेखा आहेत. आख्यायिका, दंतकथा किंवा इतिहासातील कथा निवडून त्यांतील स्त्रिया रंगविल्या गेल्या आहेत. (आपल्याकडे असे व्यक्तिरेखाटन खाडिलकर किंवा वि. वा. शिरवाडकरांच्या नाटकांतून आढळते) स्त्रीच्या वास्तव स्वरूपापेक्षा तिचे तथाकथित गूढत्व, दैवत्व, आणि सौंदर्य यांच्यावर अशा चित्रणात भर दिला जातो. तिला आदर्श स्वरूपात, पुरुषांना ती जशी हवीशी वाटते त्या स्वरूपात सादर केले जाते. 'कॅटिलीन'मधील फ्यूरिया, 'फीस्ट अ‍ॅट सोलहूग'मधील मार्गरिट् आणि सिग्ने, 'लेडी इंगेर' मधील राणी इंगेर, 'बेरिअल माऊंड'मधील ब्लांका, 'वायकिंग्ज' मधील ह्योर्दिस आणि गूनहील्ड, 'प्रिटेंडर्स' मधील इंगेबोर्ग आणि मार्गरिट्, 'ओलाफ सिलमेकान्स'मधील आल्फहील्ड, 'ब्रान्द'मधील अ‍ॅग्निस, 'पेअर ग्यून्ट' मधील झोलवेय्ग अशांसारख्या व्यक्तिरेखा रोमॅन्टिक, भूतकाळाला उजाळा देणाऱ्या, काव्य-


## FORM IV

( रूल नं. ८, रजिस्ट्रेशन ऑफ न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वये प्रकाशित )

| | | |
|---|---|---|
| प्रकाशन स्थळ | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ ( जि. सातारा ) |
| प्रकाशन दिनांक | : | दरमहा १ तारीख |
| मुद्रक | : | श्रीकृष्ण गजानन दीक्षित |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| पत्ता | : | द्वारा– दी प्राज्ञ प्रेस, वाई ४१२ ८०३ ( जि. सातारा ) |
| प्रकाशक व संपादक | : | मेघश्याम पुंडलिक रेगे |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| पत्ता | : | 'रागिणी', साहित्य सहवास, वांद्रा ( पूर्व ), मुंबई ४०० ०५१ |
| मालक | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ ( जि. सातारा ) |

मी मेघश्याम पुंडलिक रेगे जाहीर करतो, की वर दिलेली माहिती माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे संपूर्णतः खरी आहे.

मे. पुं. रेगे
प्रकाशक

मय आणि क्वचित भावविवश व्हायला लावू पाहणाऱ्या आहेत. नॉर्वेबाहेरच्या जगताला त्या फारशा माहीत नाहीत पण नॉर्वेत जो परंपराप्रेमी प्रेक्षक होता व आहे त्यांना त्या सुखावणाऱ्या आहेत. इब्सेनने त्या प्रतिभेने आणि कौशल्याने रेखाटल्या आहेत आणि त्यांपैकी काही रंगभूमीवर यशस्वी ठरतात हे त्यांचे विशेष होत. अशाच प्रकारच्या व्यक्तिरेखा जर्मनीत शिलरने तर डेन्मार्कमध्ये हायबर्गने निर्माण करून लोकप्रियता संपादन केली होती हे इब्सेनच्या डोळ्यांसमोर होते. या रोमॅन्टिक पठडीच्या प्रभावातून बाहेर पडायला इब्सेनला बरीच वर्षे लागलेली दिसतात. स्वतःच्या जीवनातील भलेबुरे अनुभव इब्सेनने या व्यक्तिरेखांभोवती गुंफल्यामुळे तो या प्रकारात जास्त काळ रमला असावा.

रोमन इतिहासातील एका घटनेवर आधारलेल्या 'कॅटिलीना' ह्या पहिल्याच नाट्यकृतीत इब्सेनने 'फ्यूरिया' नावाची स्त्री-व्यक्तिरेखा निर्माण केली आहे. ती पुढील विशिष्ट प्रकारच्या नायिकांची मूलप्रतिमा आहे. ह्योर्दिस, रिबेका वेस्ट, हेद्दा गाब्लर, हिल्डा वांगेल यांसारख्या पुढे ज्या गाजलेल्या नायिका येतात त्यांची बीजे फ्यूरियात दिसून येतात. ती कॅटिलीन या नायकाचा विनाश घडवून आणते. त्याला रोमच्या भ्रष्ट सत्तेविरुद्ध चिथावते आणि आतून त्याच्या कटाची बातमी रोमच्या सत्ताधाऱ्यांना देते. कॅटिलीनचा वध झाल्यावर स्वतःलाही ती ठार मारून घेते. पण फ्यूरिआ हे करते कारण एके काळी तिच्या बहिणीला नादी लावून कॅटिलीनने त्या बहिणीची वंचना केली आहे. परिणामी त्या बहिणीने आत्महत्या केली आहे. नदीत बुडून ती मरण पावली आहे. म्हणजे फ्यूरिआच्या सूडाचे कारण समजण्यासारखे आहे. पण फ्यूरिआचे

"I am your genius
I must lead you wither soever you go
I am an image out of your own soul"

हे शब्द फार महत्त्वाचे आहेत. स्त्रीचे वास्तव चित्रण करण्यातून हे शब्द आलेले नाहीत तर इब्सेनला हवे असणारे हे शब्द आहेत. पुरुषाला एखादी आदर्श स्त्री हवी असते. तिचे प्रतिबिंब कॅटिलीन फ्यूरिआत पाहात आहे. प्रेरणा देणारी आणि वेळप्रसंगी जिवावर बेतणारी परंतु प्रभावी मदालसा स्त्री. खलनायिका हा शब्द अचूक होणार नाही. पण फ्यूरिआची नाटकातील भूमिका लेडी मॅकबेथ जे घडविते त्यासारखी आहे. अर्थात फ्यूरिआ ही यामुळेच मिथिकल वाटते. सॅमसनच्या बाबतीत डिलायला जशी वाटते तशी. प्रत्यक्ष जीवनात अशा स्त्रियाही दिसत नाहीत आणि असे घडतही नाही. अर्वाचीन काळातील रचनाच भिन्न आहेत. भारताच्या फाळणीचे खापर, नेहरूंवर लेडी माऊंटबॅटनचा प्रभाव होता म्हणून तिला खलनायिका कल्पून तिच्या डोक्यावर फोडणे व शोकान्तिका रंगविण्याचा प्रयत्न करणे हे टिकण्यासारखे नाही.

'लेडी इंगेर ऑफ योस्त्रॉत' या नाटकाची नायिका विधवा राणी इंगेर ही व्यक्तिरेखा अर्थातच जास्त गुंतागुंतीची व कौशल्याने रेखाटलेली व्यक्तिरेखा होय. आपल्याकडील झाशीच्या राणीसारखी काहीशी ही व्यक्तिरेखा आहे. नॉर्वेच्या स्वातंत्र्यलढ्यातील एक आद्य स्वातंत्र्यनेता (देवता) म्हणून इब्सेनने तिला रंगविले आहे. इतिहासापेक्षा काल्पनिक इतिहास येथे जास्त महत्त्वाचा ठरतो. सरदारांना एकत्र करून डेन्मार्कविरुद्ध स्वातंत्र्यलढा उभारण्यात लेडी इंगेर अपयशी ठरली हा इतिहास; पण स्वतःच्या मुलाची हत्या राणी इंगेरच्या हातून नकळत होते आणि त्यातून ती सावरू शकत नाही असे इब्सेनने दाखविले आहे आपल्याकडे शिवाजी, लक्ष्मीबाई यांच्याभोवती जशा दंतकथा आहेत व लोक त्या खऱ्या समजून चालतात तशा दंतकथा मध्ययुगीन नोर्स राजेरजवाड्यांभोवती आहेत त्यांचा वापर इब्सेनने स्वतःच्या सोयीने केला आहे, आणि झाशीच्या राणीसारखीच 'राष्ट्रीय नायिका' निर्माण केली आहे. प्रत्यक्षात राणी इंगेर कोणी शूर योद्धा नव्हती व डॅनिशविरोधीही नव्हती या सत्याला बगल देऊन इब्सेनने नॉर्वेवर प्रेम करणारी धीरोदात्त नायिका रंगविली आहे. कट-कारस्थानाच्या या नाटकात नील्स ल्यूक्क् हा खलनायक रंगवून तो विनाशाला कारणीभूत ठरतो असे दाखविले आहे.

प्रबळ इच्छाशक्ती आणि कृती करण्याची क्षमता यांचा पूर्ण अभाव असल्याने लेडी इंगेर हॅम्लेटप्रमाणेच मृत्यूप्रत जाते. शत्रूचा विनाश करण्याऐवजी स्वतःच विनाश पावते. नील्स ल्यूक्क् हा इंगेरच्या दोन्ही मुलींचा बळी घेतो आणि त्याचा परिणाम राणीसाहेबांचे मनोधैर्य खच्ची होण्यात होतो असाही भाग इब्सेनने रचला आहे. नाटक तत्कालीन फ्रेंच नाटककार स्क्रीब याच्या तंत्राप्रमाणे गुंतागुंतीच्या रचनेचे आहे हे खरे, परंतु लेडी












इंगेरची व्यक्तिरेखा जिवंत आणि हळुवारपणे उभी करण्यात येथे इब्सेनला यश आलेले दिसते. तत्कालीन सुप्रसिद्ध डॅनिश समीक्षक गेऑर्ग ब्रान्दीस याने लेडी इंगेरच्या व्यक्तिरेखेची मनमोकळी प्रशंसा केली आहे. दूर असणारा एकाकी किल्ला, त्याला वेढून राहिलेले निसर्गरम्य पण गूढ व निराश वातावरण, शेजारीच आदळणाऱ्या समुद्राच्या लाटा, वर फिरणारे समुद्रपक्षी, सुंदर मुलगी एलिना, विश्वासू सरदार स्काकतावल, दरबारचा जुना पण भव्य मंडप, तळघरे, बाहेर पडून जायला गुप्त भुयारे, कडेकोट बंदोबस्त, सटासट खून पडणे, रक्त सांडणे, समज-गैरसमज या रोमँटिक ऐतिहासिक वाङ्मयात असणाऱ्या घटकांचा कौशल्याने वापर करून इब्सेनने शोकात्म इंगेरभोवती प्रभावी वातावरण तयार केले आहे. इब्सेन राणीसाहेबांचे मनोव्यापार रंगविण्यात यशस्वी ठरलेला आहे आणि नाटकातील काव्य औचित्यपूर्ण आहे. लेडी इंगेर हे रंगभूमीवर फार यशस्वी झाले नाही पण देशभक्त वाचकांचे मन जिंकून जाणारी व्यक्तिरेखा म्हणून 'लेडी इंगेर' यशस्वीच ठरले. शिवाय आपण केंद्रस्थानी स्त्रीनायिका धरून शोकान्तिका लिहू शकतो याची प्रचिती इब्सेनला आली.

मार्गिट ही इब्सेनच्या पुढच्या 'दि फीस्ट अॅट सोलहूग' या नाटकाची नायिका व्यक्तिचित्रणाच्या दृष्टीने पुढचे पाऊल नाही. पसंत नसलेल्या बेंग्ट गाऊटसन या वयस्क जमीनदाराची अगदी तरुण पत्नी मार्गिट तिच्या प्रियकरासाठी, गूडमुंड आल्फ झोन याच्यासाठी तळमळते आहे. तीन वर्षे लग्नाला झाली असली तरी तिला मूलबाळ झालेले नाही. तेव्हा हद्पार केला गेलेला गूडमुंड तिच्या आश्रयाला येतो त्या वेळी साहजिकच ती त्याच्याबरोबर निघून जाईल असे आपल्याला वाटते. पण गूडमुंड तिच्या बहिणीवर, सिन्थेवरच फिदा होतो. स्वतःच्या नवऱ्याला विष मद्यात मिसळून मारायचा मार्गिट प्रयत्न करते पण तो फसतो. अर्थात जमीनदार बेंग्ट हातघाईच्या एका प्रसंगी मारला जातो. गुडमुंड व सिन्थे हे लग्नाची घोषणा करतात. दुष्ट का होईना पण नवराही नाही नि प्रियकरही नाही अशा विफल अवस्थेतील मार्गिट ख्रिश्चन संन्यासिनी होण्याचे ठरविते. अशी या नायिकेची कथा आहे. मार्गिटच्या भावनांचे चित्रण खरोखरच अतिशय उत्कट आणि कार्व्यमय आहे. पण बेर्गेनसारख्या शहरात मार्गिट संन्यासिनी होते हीच घटना लोकांची मने जिंकून गेली. राष्ट्रीय नायिका इंगेर आणि ख्रिश्चन संन्यासिनी होणारी नायिका मार्गिट या लगोलग रंगभूमीवर आल्यामुळे इब्सेन नॉर्वे हे स्वतंत्र अस्मितेचे स्वतंत्र राष्ट्र असावे असे मानणाऱ्या उजव्या राजकीय पक्षाचा असावा असे मानले जाऊ लागले. सुटसुटीत तीन अंकी स्वरूप व झपाटयाने घडणाऱ्या घटना यांमुळे 'फीस्ट' रंगभूमीवर यशस्वी झाले, आणि उजव्या विचारांच्या मंडळींची सहानुभूती (निष्कारणच) इब्सेनच्या मागे उभी राहिली. या नाटकाचा एक फायदा इब्सेनला झाला, तो म्हणजे माग्दालेना थोरेसन या लेखिकेची मैत्री इब्सेनला मिळाली व तिच्यातूनच माग्दालेनाची सावत्र मुलगी सुझाना आणि इब्सेन यांचा प्रेमविवाह झाला.

प्रत्यक्ष रंगभूमीवर सुखान्तिकेसारखे वाटले तरी मार्गिट या व्यक्तिरेखेच्या संदर्भात 'फीस्ट' शोकनाट्य आहे. मार्गिट विवाह होऊनही पूर्ण असमाधानी आहे. गूडमुंड परत येतो तेव्हा तिच्या आशा चाळवतात. नूट येर्सलिंग या राजाच्या शेरीफला स्वतःची बहीण सिन्थे देऊन टाकायची, त्याच्यासाठी मध्ये आड येणाऱ्या स्वतःच्या नवऱ्याला बेंग्टला विष देऊन ठार करायचे आणि गूडमुंडशी नंतर लग्न करून हवा तो नवराही मिळवायचा नि सोलहूगची इस्टेटही मिळवायची असा तिचा डाव आहे. हा डाव पार पडला असता तर ही सुखात्मिका ठरली असती. परंतु इब्सेन स्क्रीब या नाटककाराच्या प्रभावाखाली असला तरी स्वतःची स्वतंत्र प्रतिभा त्याला होतीच. जीवन दुःखानेच जास्त भरलेले असते ही त्याची धारणाही सुरुवातीपासूनच होती. त्याचा परिणाम म्हणून फीस्ट ट्रॅजिकॉमेडी परंतु प्रत्यक्षात मार्गिटच्या दृष्टीने शोकान्तिका होताना दिसते. मार्गिट उद्विग्न होऊनच निर्णय घेते. विधवा म्हणून मिळणारी मोठी जमीन व इस्टेट आणि सळसळते तारुण्य तिच्याजवळ आहेत; पण ती त्यांचा त्याग करते आणि निवृत्तीचा संन्यासमार्ग स्वीकारते. रंगभूमीवर हे मनःपरिवर्तन 'पुण्यप्रभावा'प्रमाणेच झटपट आणि तकलुपी वाटले असले तरी बेर्गेनच्या सनातनी मंडळींना ते भावले असणार. हा शेवट आणि पुढे 'लेडी फ्रॉम दि सी'चा शेवट ह्यांची तुलना केली म्हणजे इब्सेनने किती दूरचा पल्ला गाठला आहे हे दिसून येते.

'आल्फहील्ड' ही पुढच्या 'ओलाफ लिलयेक्रान्स' या सुखान्तिकेची नायिका आहे. ही नायिका वास्तव

स्त्री-चित्रणापेक्षा देखील इब्सेनच्या मनोवांछित स्वप्नाचे प्रक्षेपण होय. पर्वतात राहणाऱ्या एकाकी व सुंदर आदिवासी तरुणीच्या मोहपाशात लग्न ठरलेला नायक ओलाफ पडतो आणि काही विघ्ने येऊन आणि अगदी शेवटी तर डाकीण समजल्या जाणाऱ्या आणि जाळण्याची शिक्षा झालेल्या आल्फहील्डला ऐन वेळी सोडवून तिच्याशी तो विवाहबद्ध होतो अशी ही कथा आहे. कथा पाहिली तरी हा हिंदी सिनेमाच आहे हे आपल्याकडील वाचक ओळखेल. शिक्षित आणि खानदानी प्रतिष्ठित कुटुंबातील नायक आणि खेडवळ, अडाणी परंतु सुंदर नायिका यांचे मिलन दाखविणे हा रोमॅण्टिक दृष्टिकोणाचा भाग होता. वर्डस्वर्थने आणि रूसोने साध्या खेडवळ ग्रामीण जीवनातील सौंदर्य व साधेपणा यांची महती गायली. ग्रामीण तरुण किंवा तरुणी यांची मनेही उदात्त, विकसित असल्याचे निदर्शनास आणले. आणि याचीच परिणती ग्रामीण किंवा वनवासी नायिकांचा गौरव करण्यात झाली. क्वचित्प्रसंगी अशी प्रेमप्रकरणे किंवा लग्ने घडतही आणि आजही घडतात. पण त्यांच्याकडे वस्तुनिष्ठ दृष्टीने न पाहता गौरवाच्या आणि आदर्शपूर्तीच्या दृष्टीने पाहणे हा रोमँटिक प्रकार आहे. आणि असा प्रकार १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात भरपूर चाले. इब्सेनने तोच येथे केला आहे.

आल्फहील्ड ही पर्वतराजीतील अशिक्षित सुंदरी आहे. तिला विलक्षण मनोयातनातून जावे लागते. नायकाची आई किर्स्टन ही तर अखेरीस तिला डाकीण समजून जाळायला निघते. या प्रसंगावर आपले नाटक चांगले चालेल असा इब्सेनचा अंदाज होता आणि मोठ्या शिताफीने हा प्रसंग त्याने क्लायमॅक्स म्हणून नाटकाच्या शेवटी आणला आहे. पण नाटक चालले नाही. पुढे बऱ्याच वर्षांनी, या नाटकाला एडवर्ड ग्रीगसारख्यांनी संगीत दिल्यास हेही नाटक 'पेअर ग्यून्ट'-सारखे गाजेल असा इब्सेनचा कयास होता. पण तसे संगीत दिले गेले नाही व नाटक बाजूला पडले. मात्र महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना हे नाटक वाचताना मौज वाटते. 'ॲज यू लाईक इट' प्रमाणेच ते आवडू शकते.

वैचारिक दृष्ट्या 'आल्फहील्ड' महत्त्वाची आहे. परमेश्वर हा चर्चमध्ये कसा असेल ? निसर्ग हेच त्याचे खरे रूप आहे आणि त्याच्याशीच आपण तादात्म्य पावले पाहिजे हे आल्फहील्ड ठासून मांडते, कारण आल्फहील्ड नॉर्डिक असली तरी ख्रिश्चन नाही. हा कल्पनेचा पुढे इब्सेनच्या जीवनावर प्रभाव पडत गेला. दुसरे म्हणजे उच्चवर्गीय आणि निम्नस्तरीय गटांतून येणारे नायक-नायिका यांचा विवाह येथे दाखविला आहे. नायक ओलाफ हा शहरी, सुशिक्षित नसला तरी खेड्यातील खानदानी कुटुंबातील आहे. विषम-विवाहाचा हा काव्यमय पुरस्कार आहे. नायकाच्या आईने, किर्स्टनबाईंनी ओलाफसाठी नियोजित केलेली वधू इंगेबोर्ग ही खानदानी व सुसंस्कृत आहे परंतु नायकाला या कुंडीतील झाडाविषयी आकर्षण न वाटता 'आल्फहील्ड' या रानातील वेलीविषयी वाटते. आल्फहील्ड देखील त्याला भुलविते आणि पुढे स्वतःही त्याच्या मोहपाशात पडते. हा प्रकार येथेच थांबलेला नाही. नियोजित वधू इंगेबोर्गलाही असेच आकर्षण त्यांच्याच घराण्यात वाढलेल्या हेमिंग या कनिष्ठ वर्गातील पण कर्तबगार तरुणाविषयी निर्माण होते व ती सरळ त्याच्याबरोबर पळून जाते. दोन्हीही जोड्या सामाजिक दडपणाला भीक घालीत नाहीत. 'रोमिओ ॲण्ड ज्युलिएट'च्या शोकान्तिकेच्या विरुद्ध दिशेने जाणारी अशी ही रोमॅण्टिक सुखात्मिका दिसते. तेथे दोन खानदानी घराण्यांतील तरुण-तरुणी आत्महत्येप्रत जातात तर येथे दोन विषम जोड्या विवाह करण्यात व पुढे सुखासमाधानाने नांदण्याची ग्वाही देण्यात यशस्वी ठरतात.

लेडी किर्स्टन ही सनातनी पण कणखर आणि निष्ठूर व्यक्ती इब्सेनने रंगविली आहे. लेडी किर्स्टन ही "मुलाची आई" आहे हे पदोपदी जाणवते. पण आपल्याला लेडी किर्स्टनबाईंचा फक्त शेवटचा प्रसंग सोडल्यास राग येत नाही कारण बोलूनचालून ती मध्ययुगातील सरंजामशाहीच्या संस्कारांचे प्रातिनिधित्व करणारी व्यक्तिरेखा आहे. आणि हे नाटक मुळातून एका १५ व्या शतकातील लोककथेपासूनच इब्सेनने घेतले आहे. एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीचा नॉर्वे आणि महाराष्ट्र यांच्यात प्रगतीच्या दृष्टीने व प्रबोधनाच्या दृष्टीने प्रचंड तफावत नव्हती हे लक्षात घेतले पाहिजे. नॉर्वेतील उच्चभ्रू समाजाच्या ढोंगावर व क्रौर्यावर अप्रत्यक्षपणे हल्ला चढविणारे हे नाटक व आल्फहील्डसारखी निसर्ग-कन्या बेर्गेन किंवा ऑस्लोमधील त्या वेळच्या प्रेक्षकांना आवडली नाही.

या नाटकात उभा केलेला दोन भिन्न विरोधी व्यक्तिमत्त्वांच्या नायिकांतील फरक इब्सेनने त्याच्यापुढच्या 'दि वायकिंग्ज ऑफ हेल्गेलँड' या नाटकात

पुनश्च रंगविला आणि त्यात त्याला भरपूर यश मिळाले. 'वार्यकिंग्ज 'मधील ह्योर्दिस ही आपल्याकडील भाषेत आसुरी व्यक्तिमत्त्वाची विध्वंसक स्त्री ठरते. स्वतःला प्रत्यक्षात हवा होता तो नायक आपल्याला मिळालेला नाही व आपले फसवून भलत्याच माणसाशी लग्न झालेले आहे हे उघडकीला येताच उद्विग्न आणि संतप्त नायिका, सिगूर्ग याला म्हणजे तिला प्रत्यक्षात जो हवा असतो त्याला ठार मारते आणि स्वतःही कड्यावरून खाली समुद्रात उडी मारून जलसमाधी घेते. अशी नायिका ह्योर्दिस हिची कथा आहे. ही मूळ कथा इब्सेनने आईसलॅण्डमधील एका सागा-कथेवरून (वंश-कथेवरून) घेतली. हीच कथा थोड्याफार फरकाने प्राचीन जर्मन महाकाव्य 'नींबलुंगेनलीड' यातही आली आहे.

'हेल्गेलँडवरील चांचे' ही कथा म्हणजे छोटेसे महाभारतच. सूडाने सूड कसा वाढतो आणि त्यात अनेक आहुती पडतात, याचे चित्रण येथे आहे.

सिगूर्द आणि गुणार हे मित्र असतात. ते आईसलँडला जातात. युरनूल्फ या खलाशी सरदाराला दोन मुली असतात. त्यांच्यापैकी एकीच्या प्रेमात पडतात. ह्योर्दिस ही अप्रतिम सौंदर्यवती असते. ती ज्यूकूलची मुलगी असते पण त्याला मारणाऱ्या युरनूल्फकडेच ती मोठी होते.

तिच्या गुंफेवर वीस माणसांना भारी पडेल एवढे अस्वल असते. त्याच्याशी लढणाऱ्याला मी माळ घालीन हा तिचा पण असतो. 'गुणार' हा शूर असतो तरी हे साहस त्याला झेपणारे नसते. म्हणून प्रत्यक्षात मित्रासाठी, सिगूर्द हे करतो. अंधारात स्वतःला मिठी मारणारा कोण आहे हे ह्योर्दिसला कळत नाही. ती अंगठी त्याच्या बोटात घालते. गुणार दुसऱ्या दिवशी तिला घेऊन हेल्गेलँडला पळून येतो. युरनूल्फच्या मुलीशी—डॅनीशी सिगूर्द विवाह करतो.

पुढे पाच वर्षांनी स्वतःच्या मुलीला पळवून नेल्याचा बदला घेण्यासाठी युरनूल्फ हेल्गेलँडवर गुणारचा पत्ता काढीत येतो. योगायोगाने, वाटेत दुसऱ्याच मार्गाला लागलेला सिगूर्द नेमका ह्याच वेळी या बेटावर येतो. दोघे एकमेकांना ओळखतात व मैत्रीपूर्ण संबंध निर्माण करायचे ठरवतात. पण प्रत्यक्षात मानापमान आणि बाचाबाची घडत जाते व त्याची परिणती द्वेष आणि कलहात घडवून आणण्याचे कार्य ह्योर्दिस घडविते. गुहेवरील अस्वल प्रत्यक्षात सिगूर्दने मारले आणि गुणारच्या गळ्यात तिला घातले हे रहस्य डॅनी बोलून जाते. त्याने ह्योर्दिस डिवचली जाते. तिचे सारे जीवनच फसवणुकीवर उभे आहे हे तिला उलगडते.

मृत्यूची मालिका लागते. गुणारचा छोटा मुलगा कोअर नावाचा शेतकरी मारणार असतो. त्याला वाचविण्यासाठी युरनूल्फ आणि त्याची पाच मुले जातात. वाचविण्यासाठीच्या प्रयत्नात ते मृत्युमुखी पडतात. इकडे मेजवानीच्या प्रसंगी 'तुरोल्फ' ह्या शेवटच्या अपत्याचा वध गुणार करतो कारण 'आयधिल' चा वध करण्यासाठी युरनूल्फ गेला आहे असे तुरोल्फ चुकून सांगतो. मेजवानीच्या प्रसंगी अस्वलाला मारले ते सिगूर्दने, हे रहस्य डॅनीच्या तोंडून बाहेर पडते. त्याचे पर्यवसान ह्योर्दिसकडून दोघांचे द्वंद्व घडवून आणण्यात होते.

प्रत्यक्षात सिगूर्द आणि ह्योर्दिस हे एकमेकांवर प्रेम करीत होते ही घटना दोघांनाही उमगते. गुणारला मारल्यावर आपण (सिगूर्दला) मारल्यास आपला पुढील मार्ग निर्वेध होईल असे वाटून ह्योर्दिस द्वंद्वाची कल्पना पुढे आणते. पण सिगूर्द मनापासून तयार नसतो. स्वतःच्या केसांची दोरी धनुष्याला चढवून ह्योर्दिस सिगूर्दला ठार मारते आणि स्वतः डोंगराच्या कड्यावरून खवळलेल्या समुद्रात उडी टाकून आत्महत्या करते.

सलोखा कुठल्याच वेळी होऊ शकत नाही कारण ह्योर्दिसचे खुनशी, महत्त्वाकांक्षी आणि स्वतःला फार शूर व सुंदर समजणारे व्यक्तिमत्त्व दरवेळी आड येते. आत्मप्रेम आणि तेही सूड व कलहाच्या भाषेत व्यक्त होणारे, हाच ह्योर्दिसचा स्थायिभाव असतो. युरनूल्फ तिला पळवून नेली म्हणून 'रखेली' म्हणतो, सिगूर्दने तिला त्याच्या नेभळट मित्राच्या गळ्यात बांधली हे तिला कळते, तुरोल्फ तिला मेजवानीप्रसंगी लागेलसे बोलतो; तिला मनातून खरोखर सिगूर्द आवडलेला असतो, इ. इ. अनेक कारणे होतात आणि ती तिला पुरतात.

ह्योर्दिस ही मिथ्यकथेतील पौराणिक नायिका आहे. मूळ कथेत बदल करण्याचे स्वातंत्र्य इब्सेनला नव्हते कारण ती जनमानसात रुळलेली कथा होती. पण इब्सेनला ही कथा अतिशय थोडक्या प्रसंगांतून रंगभूमीवर मांडण्यात आणि ह्योर्दिसचे प्रभावी व्यक्तिचित्रण करण्यात यश मिळाले. स्त्रीची सूडभावना पुरुषापेक्षा जास्त खोलवर जाते आणि विनाशाला कारणीभूत होऊ शकते








ही एक रूढ (गैर) समजूत इब्सेनने या व्यक्तिचित्रणात वापरून घेतली आहे. ह्योर्दिसच्या मागे असलेल्या स्कॅण्डिनेवियन पार्श्वभूमीचा फायदा मिळाला व हे नाटक उत्कृष्ट तऱ्हेने रंगभूमीवर आले. आजतागायत त्याचे प्रयोग रंगभूमीवर होत असतात. मृत्युमुग्ध आणि आत्मविनाशकारी शोकात्म व्यक्तिमत्त्व म्हणून ह्योर्दिस प्रेक्षकांची मने जिंकू शकते. लेडी मॅकबेथ किंवा मिडिआ-प्रमाणेच ही अभिनयाला वाव आणि आव्हान देणारी भूमिका आहे असे उत्तमोत्तम नटचांना वाटत आलेले आहे. ह्योर्दिस 'तक्षशीले'च्या रूपाने मराठी रंगभूमीवर आली ही घटना बोलकी आहे. बालगंधर्वापर्यंत चालत आलेल्या पौराणिक-ऐतिहासिक संगीत रंगभूमीला 'तक्षशीला' (ह्योर्दिस) जवळची वाटावी अशी होती.

ह्योर्दिसच्या व्यक्तिरेखेवर आधारलेली इब्सेनची "हेदा गाब्लर" ही व्यक्तिरेखाही अशीच अजरामर ठरली आहे. अर्थात हेदा गाब्लरचा संदर्भ पूर्णपणे आधुनिक आहे. ह्योर्दिस अगतिकता आणि विचित्र उन्माद यांच्या भरात स्वतःच्या प्रियकराला ठार मारते तर हेदा एकेकाळचा प्रियकर हाती लागण्याची शक्यता नाही हे उमगताच त्याला आत्महत्येला प्रवृत्त करते आणि स्वतःलाही गोळी धालून ठार करते. आहे तो नवरा ठार करावा असे दोघींच्या मनात येत नाही; पण तो ठार व्हावा असे मात्र त्यांना वाटत राहते. ह्योर्दिस, स्वतःला मुलगा झालेला असूनही त्याचा विचार न करण्याइतकी कडवट विषारी बनते. त्याचा द्वेष करण्या-पर्यंत तिची मजल जाते. तर हेदा पोटात, अधिकृत नवऱ्याचा, योर्गेन टेसमानचा गर्भ असल्याची शंका येताच कमालीची संतापते. ह्योर्दिस ही व्यक्तिरेखा लोकांनी डोक्यावर घेतली याचे कारण तिला स्वीकृत अशाच मिथ्यकथेचा आधार होता आणि इब्सेनने ह्योर्दिस अतिशय काव्यात्म तऱ्हेने रंगविली. तर हेदा आजही लोक मंत्रमुग्ध होऊन पाहातात याचे कारण अतिशय प्रगल्भ आणि परिपक्व नाटककाराची ती निर्मिती आहे. हेदाच्या मानसिक जडणघडणीमुळे ती विश्वसनीय व प्रभावी ठरते.

मिळालेला नवरा आणि त्याच्या बरोबरच्या संसाराचे पूर्ण वैफल्यग्रस्त स्वरूप हे अनेक इब्सेनी स्त्री-व्यक्तिरेखांच्या वाटचाला येते (पुरुषांबाबतही असे होते.) ही विफलता मार्गिटच्या भाषेत एक प्रदीर्घ रात्र असते आणि सूर्योदय होण्याची मात्र शक्यता नसते. आपण लग्नात स्वतःला विकून बसलो आहोत, स्वतःला पार हरवून बसलो आहोत ही या स्त्रियांची स्फोटक उद्विग्नता असते. मार्गिट, ह्योर्दिस, हेदा, नोरा, आल्विंग, एलिदा, सौ. राईन्थहाईम, माया रूबेक या सर्व लग्नात फसलेल्या नायिका आहेत.

" For me is life but a long, black night,
Nor sun, nor star for me shines bright.
I have sold my youth and my liberty
And none from my bargain can set me free.
My heart's content I have bartered for gold,
With gilded chains I have fettered myself; "
( Act I )

But deep in my heart was graven each song
You had ever sung;
( Act I ) – "फीस्ट"

या मार्गिटच्या उद्गारांत इब्सेनच्या म्हणून ज्या खास नायिका प्रसिद्ध पावल्या आहेत त्यांच्या भावना भळभळा वाहात आहेत. मार्गिट स्वतःच्या नवऱ्याचा खून करायचा प्रयत्न करते व शेवटी संन्यास घेते. ह्योर्दिस त्याला द्वंद्वयुद्धात गोवून मारण्याचा डाव टाकते आणि स्वतःलाही अखेरीस मृत्यूच्या जबड्यात लोटते. नोरा घटस्फोट देऊन घराबाहेर पडते, आल्विंगबाईंचा नवरा लवकर वारतो हीच त्यांची सुटका ठरते. एलिदा नव्याने संसाराशी एकरूप व्हायचा प्रयत्न करते. गून-हील्ड बोर्कमान गुन्हेगार ठरलेल्या नवऱ्याला सरळ वरच्या मजल्यावरच्या खोलीत कोंडून घालते आणि त्याच्याशी संभाषणही बंद करते. तर माया रूबेक आर्नेल्डला सोडून डल्फहाईम या स्वच्छंदी शिकाऱ्या-बरोबर निघून जाते. विवाहसंबंधातील पूर्ण वैफल्य हा इब्सेनच्या ऐतिहासिक-पौराणिक आणि नंतरच्या काल-खंडातील आधुनिक नायिकांना आणि स्त्रीरेखांना जोडणारा महत्त्वाचा दुवा होय.

'वायकिंग्ज' नंतर इब्सेन बरीच वर्षे वैफल्यग्रस्त आणि अनवट वाटेने जाणाऱ्या नायिका सोडून पारंपरिक मूल्यांना उजाळा देणाऱ्या आणि सात्त्विक पिंडाच्या नायिका, व्यक्तिरेखा रंगविताना दिसतो.

कदाचित अशा नायिका रंगविणे कमी नाटयपूर्ण असले तरी जास्त वास्तवाला धरून आहे असा त्याचा ग्रह (रास्त समज) झाल्याने हे घडले असावे. प्रिटेन्डर्स या त्याच्या सर्वश्रेष्ठ ऐतिहासिक नाटकातील रानहील्ड आणि मार्गरिट् (मार्गिट नव्हे) या स्त्रीरेखा, ब्रान्द-मधील ॲग्निस, पेअर ग्यून्टमधील पेअरची आई ऑझ्अ आणि पत्नी झोलवेय्य, एम्परर ज्यूलिअनची पत्नी हेलेना, या सर्व स्त्रीरेखा परंपरेच्या आणि रूढ व्यवहाराच्या चौकटी सांभाळीत स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार आणि विकास करतात. 'लव्ह्ज् कॉमेडी' या नाटकातील नायिकादेखील फाल्क या रोमँटिक स्वच्छंदी कवीची 'सहजीवन' जगण्याची कल्पना दूर सारून प्रत्यक्षात यशस्वी आणि श्रीमंत व्यापाऱ्याशी तो वयाने बराच मोठा असला तरी विवाह करते. इब्सेनच्या प्रतिमेशी ह्या पारंपरिक स्त्रियांची नावे प्रामुख्याने निगडित नाहीत. गडकरीथाटाची ॲग्निस किंवा प्रिटेन्डर्समधील मार्गरिट् इब्सेनने रंगविली आहे हे खरेही आज कोणाला खरे वाटणार नाही. पण ते खरे आहे. पेअर ग्यून्टच्या स्वर्गीय सगीतात पेअरची आई ऑझ्अ आणि वर्षानुवर्षे वाट पाहणारी पेनीलोपीची आठवण करून देणारी पत्नी झोलवेय्य या उंची गाठतात. त्याग आणि प्रेम ही मूल्ये जतन करणारी पारंपरिक स्त्री स्वतः सोसते पण पुरुषाचे जीवन उजळते आणि अर्थपूर्ण करते. यातील सामर्थ्य इब्सेनला जरूर जाणवले होते. खुद्द इब्सेनची पत्नी बऱ्याच प्रमाणात विचाराने आधुनिक असली तरी आचरणात जुन्या पत्नीप्रमाणेच होती. पारंपरिक ख्रिश्चन मूल्यांचा तेजस्वी आविष्कार करणाऱ्या इब्सेनच्या स्त्रीव्यक्तिरेखा नॉर्वेमधील आणि स्कॅण्डिनेव्हियामधील त्याच्या वाचकांना आणि प्रेक्षकांना माहिती आहेत व भावलेल्याही आहेत. चर्चच्या भव्य इमारती आणि त्यांतील ऑर्गनवरील संगीत आणि कोरल गीते उंचीवर पोहोचू शकतात त्याप्रमाणे पारंपरिक मूल्यांत जखडलेल्या स्त्रियाही वेगळ्या प्रकारची उंची गाठू शकतात याची पूर्ण कल्पना इब्सेनला होती. किंबहुना इब्सेनचे हे खास मोठेपण होय की नव्या विचारांचा उद्रेक आणि स्फोट करणाऱ्या नायिका रंगविताना हा इब्सेन अत्यंत कौशल्याने आणि सहृदयतेने सात्त्विक पिंडाच्या सोशीक स्त्रियाही रंगवितो. दस्तयेवस्कीप्रमाणे तो त्यांचा पुरस्कार करीत नाही पण त्यांच्यावर कुठल्याही प्रकारचा अन्याय होऊ न देण्याची खबरदारी घेतो. याचे कारण इब्सेनचा व्यक्तिवाद स्वतःच्या बाबतीत कठोर असला तरी पारंपरिक व्यक्तिरेखा रंगविताना माणुसकी आणि सहानुभूती यांचे विस्मरण होऊ न देण्याइतपत जागरूक होता. आणि म्हणूनच 'प्रिटेन्डर्स'मध्ये विजय मिळाल्यावर, पराभूत राजा स्कूल्येची मुलगी ह्याकोन कौतुकाने पत्नी म्हणून स्वीकारतो.

ह्याकोन : स्कूल्येजी, तुमच्याकडून आज मी राज्य हिरावून घेतलंय् त्यात तुमच्या लाडक्या कन्येला भागीदार होऊ द्यात !

स्कूल्ये : माझी पोर !

मार्गरिट् : हे देवा !

ह्याकोन : मार्गरिट्, तू माझी राणी होशील ना? (मार्गरिट् स्तब्ध उभी)

ह्याकोन : (तिचा हात हातात घेत) मग काय !

मार्गरिट् : (हळुवारपणे) आपली पत्नी मी आनंदाने होईन. ... ...

ह्याकोन : (तिच्याजवळ जात) शहाण्या राणीला या देशात खूप काही करता येईल. तू शहाणी, समंजस आहेस म्हणून तर मी तुझी निवड अगदी निर्धोकपणे केली.

मार्गरिट् : फक्त एवढंच !

ह्याकोन : म्हणजे ?

मार्गरिट् : तसं काही नाही, राजेसाहेब.

ह्याकोन : माझ्यासाठी तुला काही आशांवर पाणी सोडावं लागलं तर माझ्यावर राग मात्र धरू नकोस.

मार्गरिट् : तुमच्यासाठी मला कुठलेच मनोरथ सोडून द्यावे लागणार नाहीत.

ह्याकोन : तू सदोदित माझी सोबत करशील आणि वेळप्रसंगी मला सल्लामसलत देशील.

मार्गरिट् : निश्चितच मी आपली सोबत करीन.

ह्याकोन : आणि मला योग्य सल्लाही देशील. मी ऋणी राहीन त्याबद्दल स्त्रीचा सल्ला पुरुषाचे भलेच करतो. तुझ्याखेरीज मी कोणालाच जवळ राखणार नाही. अगदी माझ्या आईलादेखील मी दूर पाठवितोय-

मार्गरिट् : किती जीव होता आपला तिच्यावर— ओः !

ह्याकोन : आणि मी आहे राजा...

मार्गरिट् : (खिन्नपणे हसत) होय, खूप वर्षे लोटली तरी तुम्ही मला दूर करणार नाही.

ह्याकोन : (आनंदून) तुला दूर करायचे ? छे ! ते कालत्रयी होणार नाही.

मार्गरिट् : (साश्रू नयनांनी) नाहीच, अगदी जवळची माणसे असतात त्यांनाच ह्याकोन दूर ठेवतो."

असे हृद्य व मृदू चित्रण इब्सेन करू शकतो. 'ब्रान्द'मधील अपत्यवियोगाच्या दुःखाला सामोरी जाणारी आई इब्सेनने अशाच हळुवार हातांनी रंगविली आहे. कौटुंबिक आणि भावड्या, हळुवार मनाच्या प्रेक्षकांच्या डोळ्यांतून अश्रू काढण्यात नाटककाराचे कसब दडलेले असते असे मानणाऱ्या नव्हे तर संयत आणि सावध प्रेक्षकालाही हेलावून टाकेल असे हे चित्रण आहे.

कित्येक वर्षांनी परतणाऱ्या पेअरची केवळ जबरदस्त श्रद्धेच्या जोरावर वाट पाहणारी, एका हातात काठी आणि एका हातात बायबल घेऊन येणारी आंधळी झोलवेय्य जेव्हा आपल्या पुढे येते आणि तिच्यामागे जेव्हा उंचच उंच चकाकणारी हिमशिखरे पहाटेच्या वेळी आपल्या नजरेला पडतात तेव्हा काय घडते ? आपण आपली वैचारिकता हरवतो आणि उदात्त व उत्कट आध्यात्मिकतेमुळे पार हेलावून जातोच ना ? अनेकांच्या डोळ्यांच्या कडा ओलावू शकतात की नाही ?

ही ताकद, ही पारंपरिक भावविवशता इब्सेनने पुढे निग्रहाने दूर ठेवलेली आहे. ज्याला सेण्टिमेण्टल, मेलोड्रॅमॅटिक म्हणता येईल अशा घटना, भावना, व्यक्तिमत्त्वातील अंगे कटाक्षाने टाळली आहेत. इब्सेनच्या या निर्धाराचा आदरच केला पाहिजे; पण त्याच्या प्रदीर्घ आणि असामान्य निर्मिती-प्रवासातील हे रंग आपण पार विसरता कामा नयत. यासाठीच की सत्य हे पूर्ण असते ही त्याला प्रिय असणारी जाणीव आपल्यालाही राहावी.

– ३ –

'दि लीग ऑफ यूथ' पासून इब्सेन आधुनिक स्त्रीरेखांकडे वळलेला दिसतो. 'लव्हज कॉमेडी'मध्येच सुरुवात झालेली आहे असे म्हणता येईल, परंतु तेथील लिरियल, काव्यात्म वातावरणही 'लीग' मध्ये दूर होते. इब्सेन गद्याच्या पातळीवर नुसता उतरत नाही तर पक्के पाय रोवतो. जगाला माहीत असलेला आणि लाडका झालेला इब्सेन 'लीग' मध्ये प्रथम भेटतो. ब्रिटिश समीक्षक 'दि पिलर्स ऑफ सोसायटी' हे पहिले आधुनिक नाटक मानून सुरुवात करताना दिसतात. पण हे योग्य नाही. 'लीग' पासूनच सुरुवात होते. लहानशा नगरातील उद्योगपती ब्रॅट्स्बर्ग यांच्या कुटुंबाचे चित्रण यात येते व याचीच सुधारून वाढविलेली आवृत्ती आपल्याला 'पिलर्स'मध्ये भेटते. उद्योगपती चेंबरलेन ब्रॅट्स्बर्ग यांची सेल्मा ही इब्सेनी बंडखोर आधुनिक स्त्रियांतील पहिली व्यक्तिरेखा आपल्याला 'लीग' मध्येच दिसते.

खानदानी ब्रॅट्स्बर्ग कुटुंबात सून म्हणून आलेली सेल्मा त्या घरात नुसती शोभेची बाहुली–शो-डॉल–म्हणून आहे. तिच्या शिक्षणाचाही काही उपयोग नाही. उत्तमोत्तम कपडे पण फारतर नुसते घरकाम. तिची इच्छा असूनही धंदा, बाहेरच्या घडामोडी, व्यवहार यांपासून तिला मुद्दाम दूर ठेवले जाते. घर म्हणजे सुरक्षित पिंजराच होऊन बसतो. अशात नवऱ्यावर मोठे आर्थिक अरिष्ट कोसळलेय व अब्रूचेही मातेरे होण्याच्या मार्गावर आहे. तेव्हा वादळात वीजेचा कडकडाट व्हावा त्याप्रमाणे सेल्मा चमचमते. शिक्षित आणि आधुनिक स्त्रीच्या दडपल्या गेलेल्या भावना ती त्वेषाने बोलून दाखविते. नोराच्या बंडाची पहिली भडकती चुणूक आपल्याला येथे दृष्टीस पडते–

सेल्मा : एरिकचा आवाज की काय ? बापरे, भानगड तरी काय आहे ?

चेंबरलेन : काही नाही. तू ड्रॉईंगरूममध्ये जा पाहू.

सेल्मा : छेः, मी नाही जाणार. काय प्रकार आहे हे मला कळलंच पाहिजे. एरिक, सांग पाहू मला काय प्रकार आहे तो !

एरिक : पार तीनतेरा वाजलेत. घात झालाय् !

सेल्मा : घात झालाय !

थोरा : घात ?

सेल्मा : कशाचा घात झाला ?

एरिक : साऱ्याच गोष्टींचा.

सेल्मा : तुझा पैसाअडका गेला की काय ?

एरिक : पैसा, घरदार, वारसा– सारं काही !

सेल्मा : म्हणजे झालं का सारं काही ?

एरिक : जाऊ देत ते. चल सेल्मा, तू एवढी उरलीयस माझी अशी आता. झालेला आघात दोघांनी सोसला पाहिजे.

सेल्मा : आघात ? दोघांनी सोसायचा ? (किंचाळते) तो सोसायला मी समर्थ आहे असं वाटतंय तुला, आता ?

चेंबरलेन : अरे देवा–!

एरिक : काय म्हणायचंय तुला ?

अनुक्रमणिका






थोरा : सेल्मा, जरा जपून !

सेल्मा : जपून-बिपून बिलकूल नाही ! फसवाफसवी करत आणि ढोंगीपणाने जगत यापुढे मी अजिबात जाणार नाही. सत्य मला बोलून दाखविलंच पाहिजे. मी काहीही ' सहन ' करणार नाही !

एरिक : सेल्मा !

चेंबरलेन : पोरी, बोलतीय्स तरी काय तू ?

सेल्मा : ओः, किती निष्ठूरपणे वागलात आजवर तुम्ही माझ्याशी. तुम्ही सारेच जण— अगदी लज्जास्पद तऱ्हेनी. स्वीकारणं, सोसणं एवढीच माझी भूमिका— देण्याची कधी वेळच आली नाही. तुमच्यामध्ये दरिद्र्यासारखी होते मी. मी काही करावं, त्याग करावा अशी तुमची कधीच अपेक्षा नव्हती. काही सोसायला जणू मी लायकच नव्हते. तुमची घृणा— तुमचा राग आलाय् मला !

एरिक : याचा अर्थ तरी काय ?

सेल्मा : तुमच्या काळज्या, तुमची चिंता याचा कणभर तरी वाटा आपल्याला मिळावा अशासाठी तळमळत होते मी. त्याची मागणी मी करायची तेव्हा तुम्ही मला हसण्यावारी न्यायचा. तुम्ही एखाद्या बाहुली-प्रमाणे मला सजविलंत. लहान मुलाशी खेळावं तसं तुम्ही खेळवलंत मला. तुमच्या जबाबदारीत सह-भागी व्हायला किती किती आवडलं असतं मला ! जीवनात कष्टाची, वरच्या जबाबदारीची कामं मिळावीत याची मी अहोरात्र स्वप्न पाहात राहिले. आणि एरिक, तू माझ्याकडे आता येतो आहेस, केव्हा तर तुझ्याजवळ काहीच उरलं नाहीये तेव्हा. पण शेवटचा उपाय म्हणून मी बिलकूल उपयोगी पडणार नाही. तुझ्या संकटांची काडीमात्र पर्वा नाही आता मला. तुझ्याबरोबर राहायचंदेखील नाहीये मला ! त्यापेक्षा रस्त्यावर गाणी गाऊन भीक मागेन मी ! — जातेच मी आता— निघून जाते !

(मागच्या दरवाजाने बाहेर पडते)

चेंबरलेन : थोरा— या बोलण्याला काही अर्थ आहे का ?

थोरा : निश्चितच. नक्कीच अर्थ आहे तिच्या बोलण्याला. खरं म्हणजे माझ्या अगोदरच लक्षात यायला हवा होता तो. (तीही बाहेर पडते)

एरिक : छे ! सर्वस्व गेलं तरी चालेल माझं— पण तिला जाऊ देणार नाही मी ! सेल्मा ऽ सेल्मा ऽ !

(थोरा सेल्माच्या मागोमाग जाते.)

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीपासूनच चूल आणि मूल यांच्याशी जखडून ठेवणारे स्त्रीचे समाजा-तील स्थान. मग ते घर सधन का असेना—स्त्रीला अत्यंत असमाधानकारक आणि तिचे व्यक्तिमत्त्व दडपून, चिर-डून टाकणारे आहे असे युरोपीय ' प्रबोधित ' आणि ' शिक्षित ' स्त्रियांना वाटू लागले होते. या वाटण्याची सेल्मा प्रतिनिधी आहे. १८७६ साली ॲस्टा हान्सटीन हिने नॉर्वेत स्त्रीमुक्ती चळवळीस धडाकेबंद तऱ्हेने प्रारंभ केला. त्या वेळी नॉर्वेमधील स्त्रियांच्या समस्या शिगेस पोहोचल्या होत्या. तिने व्याख्यानमाला गुंफून या सम-स्यांना जाहीर तोंड फोडले आणि नॉर्वेतील सनातनी व दांभिक पुरुषी वर्चस्वावरच तोफ डागली. पण तिच्या-विरुद्ध इतकी जोरदार प्रतिक्रिया झाली की, तिला पार अमेरिकेत पळ काढावा लागला. या घटनेच्या पार्श्व-भूमीवर इब्सेनने ' दि पिलर्स ऑफ सोसायटी 'मधील लोना हेसेल ही व्यक्तिरेखा १८७७ मध्ये रंगविली आहे असे निश्चितपणे मांडले जाते. आणि ते रास्त आहे. परंतु ' युक्रांद—युवक क्रांती दल— ' (दी लीग ऑफ यूथ) हे नाटक १८६९ मधले आहे. म्हणजे स्त्रीमुक्तिवादी बंडखोर विचार मांडावे असे इब्सेनला कितीतरी आधी-पासून जाणवू लागले होते हे दिसून येते. पण मध्ययुगीन वा पंधराव्या-सोळाव्या शतकांच्या संदर्भचौकटीतील विषय व कथानके घेऊन लिहिणाऱ्या इब्सेनला ते इतक्या सहज शक्य नव्हते. १८६२ मध्ये इब्सेनने ' लव्हज कॉमेडी ' लिहिले तेव्हापासूनच हे विचार मांडण्याची ऊर्मी त्याला वाटत असावी; पण वळण एकदम बदलणे रंगभूमीच्या दृष्टीने त्याला कठीण गेले असावे. नॉर्वे सोडल्यावर इब्सेन मोकळ्या वातावरणात आला आणि मगच त्याला ' सेल्मा 'सारखी व्यक्तिरेखा निर्माण करता आली. ' लीग ' लिहिणारा इब्सेन जर्मनीच्या पुरोगामी वातावरणात राहात होता.

' लीग 'मध्येच श्रीमती रूंदहोमेन ह्या एका खानावळ चालविणाऱ्या विधवा बाईची व्यक्तिरेखा इब्सेनने रंगविली आहे. रूंदहोमेनबाई फारशा शिक-लेल्या नाहीत पण खानावळ त्या कार्यक्षम तऱ्हेने चालवतात. सर्व देण्या-घेण्याचे व्यवहार धडाडीने पार पाडतात. गावातली तथाकथित धेंडे त्यांच्यावर लाईन मारीत असतात. केवळ त्या देखण्या आहेत म्हणून नव्हे, तर त्यांच्याशी लग्न करणे म्हणजे आर्थिक काळजी काहीच नाही. रूंदहोमेनबाई क्वचित हव्या त्या

अनुक्रमणिका

पुरुषाशी संबंध ठेवतात. आणि लोकांच्या टीकेला भीक घालत नाहीत. त्या 'इंडिपेंडंट' आहेत. आणि शेवटी त्यांना वाटते तेव्हा त्यांच्यापेक्षा वयाने लहान असणाऱ्या एका तरुणाला– बॅस्टियनला त्या जवळ करतात. धर्म-परमार्थ यांच्या भानगडीत रूंदहोमेनबाई बिलकूल पडत नाहीत. त्यांनी बऱ्याच गोष्टींचे पाणी जोखले आहे. रूंदहोमेनबाई म्हणजे जणू पैलू न पाडलेली पण आधुनिक धारणांची स्त्री. सेल्मा, रूंदहोमेनबाईंकडे पाहून काही करते किंवा बोलते असे नाही पण कळत नकळत तिला त्या आत्मविश्वास देतात. सेल्मा शिकलेली आहे पण 'घरातील बाहुली' आहे. उलट, रूंदहोमेनबाई नव्या जगात जाऊन खंबीरपणे उभी राहिलेली जिवंत व्यक्ती आहे. सेल्माला स्टेन्सग्योअर ह्या युकांदच्या नेत्याची 'भुरळ' पडते पण रूंदहोमेनबाई स्टेन्सग्योअरलाही शिताफीने हाताळू शकतात. बेर्गेन बंदरातील सुरुवातीचे दिवस इब्सेनने एका खानावळीत घालविले. त्या खानावळवाल्या बाईचे रंग रूंदहोमेन या व्यक्तिरेखेत मिसळल्यामुळे ती इतकी जिवंत वाटते असा अंदाज करता येईल.

सात्त्विक, पारंपरिक आणि सोशीक व्यक्तिमत्त्वाची स्त्री एका बाजूला आणि बंडखोर नव्या विचारांची स्त्री दुसऱ्या बाजूला असा फरक रंगविण्याचे तंत्र इब्सेनने 'लीग'मध्ये प्रथम वापरलेले दिसते. थोरा ब्रॅट्सबर्ग ही चेंबरलेन ब्रॅट्सबर्ग उद्योगपतींची कन्या एका बाजूला तर सेल्मा आणि रूंदहोमेनबाई दुसऱ्या बाजूला असा हा फरक आहे. डॅनी आणि ह्योर्दिस यांच्यातही अशीच वैचारिक तफावत आहे पण येथे 'लीग'मध्ये ही तफावत पारंपरिक रूढीविरुद्ध आधुनिक बंडखोर विचार अशा स्वरूपात व्यक्त होते. निवडणुकांवर आधारलेल्या तथाकथित लोकशाहीचा बुरखा फाडणारे 'लीग' दणदणीत गाजले. त्या यशात या दोन प्रकारच्या भिन्न स्त्री-व्यक्तिमत्त्वांमधील रेखाटलेला फरकही मोलाचा होता हे लक्षात घेतले पाहिजे.

लोना हेसेल ही 'पिलर्स ऑफ सोसायटी'ची नायिका इब्सेनची, स्त्रीमुक्तिवादी विचार साकारणारी व्यक्तिरेखा होय. नायकाला 'मार्गदर्शन' करू शकणारी, नेहमीच्या चौकटीत न बसणाऱ्या आदर्श स्त्रीचा शोध इब्सेनच्या नाट्यसृष्टीत आल्फहील्डपासून चालू होतो. लोना हेसेल या शोधाच्या वाटेवरील महत्त्वाची निर्मिती होय. सत्य आणि स्वातंत्र्य हेच खरे समाजाचे आधारस्तंभ होत हे काहीशा ढोबळपणे लोना अखेरीस उद्घोषित करते; परंतु ते खपून जाते कारण लटपटपंच्या आणि ढोंगी उद्योजक बेर्निकला त्याच्या अपकृत्यांची जाहीर कबुली द्यायला ती भाग पाडते. नैतिक विजय तिचा होतो. केलेल्या खुनाचा जबाब पोलीसचौकीवर जाऊन द्यायला रास्कोल्निकफला सोनिया भाग पाडते तसाच हा प्रकार ठरतो. (१८६७ मध्ये प्रकाशित झालेली 'क्राईम अ‍ॅण्ड पनिशमेण्ट' १८७७ पर्यंत जर्मन अनुवादात इब्सेनने वाचली असण्याची शक्यता आहेच. ही कादंबरी त्याला आवडलेली होती.) फरक एवढाच आहे की सत्य आणि स्वातंत्र्य ही मूल्ये सोनियात ख्रिश्चन संस्कारांतून आलेली आहेत तर त्यांची महती लोना हेसेलला तिच्या अमेरिकेच्या वास्तव्यात जाणविलेली आहे.

अमेरिकेत जाऊन पंधरा वर्षे तेथे टक्केटोणपे खाऊन लोना परत आलेली आहे. ती स्वतःच्या पायावर उभी आहे. पडेल ती कामे तिने केलेली आहेत. वेळप्रसंगी हॉटेलातून गाणी गाऊन तिने चार घास कमावलेले आहेत. याहीपेक्षा भल्या-बुऱ्या प्रसंगांतून ती गेलेली आहे. ती येते आणि लांड्यालबाड्या करून समाजात वर चाललेल्या बेर्निकसाहेबांना दमात घेऊ शकते याचे कारण तिने नवे जग पाहिलेले आहे. तिला नवा आत्मविश्वास प्राप्त तर झालेला आहेच पण वेळप्रसंगी बेर्निकची अगदी जाहीर छीः थूः करायलाही ती डगमगणार नाही अशी तिची मानसिक घडण झाली आहे. हळवेपणाचा नि भाबडेपणाचा लवलेशही आता तिच्यात उरलेला नाही. जर्मनीतील वास्तव्यात इब्सेनला अशा कणखर आधुनिक स्त्रिया दिसू लागल्या होत्या. त्यांची लोना ही प्रातिनिधिक आदर्श होय.

लोनाच्या लैंगिक जीवनासंबंधी तपशीलवार माहिती प्रेक्षकांना कळत नाही. तिने योहानला (म्हणजे बेर्निकच्या मेहुण्याला) वाढविलेला आहे. ती त्याला आईसारखी आहे. जीवनाच्या संघर्षमय वातावरणात तयार झालेली लोना तिच्या बहिणीसारखी हळवी निरडकी निश्चितच राहिलेली नाही. रूढींचे पाश आणि धार्मिक श्रद्धांचे भय तिने दूर सारले आहे. ती नव्या आगामी युगाची उषा आहे.

लोनाचे सामर्थ्य इतके आहे की ती बेर्निकला अपकृत्यांचा जाहीर कबुलीजबाब देण्यास भाग पाडते आणि ही घटना घडल्यावर बेर्निक तिला अंतर देण्यास

तयार नाही अशा अवस्थेप्रत येतो. लोना वर्चस्व गाजवू पाहणारी स्त्री नाही तर न्याय्य नैतिक अधिकार शाबीत करणारी आदर्श आधुनिक स्त्री आहे हे बेर्निकला मनोमन पटते. आंधळ्या आणि हातात बायबल घेतलेल्या झोलवेय्यप्रमाणे ती नाही, तर न्यूयॉर्क बंदरातील मशाल हाती घेतलेल्या अमेरिकन स्वातंत्र्यदेवतेप्रमाणे ती आहे. लोना आणि बेर्निक यांच्या संभाषणातून बेर्निकने अडचणीच्या काळात खोटे हिशेब कसे ठेवले व पैसे (निरपराध) योहानने पळविले असा बभ्रा करून स्वतःची कर्जे उशिरा फेडण्याची संधी कशी घेतली हे कळते. स्वतःचे घराणे, घराण्याचे नाव जपण्यासाठी मोठा भाऊ या नात्याने हे करणे आपल्याला भाग पडले असा पवित्रा तो घेतो व परिणामतः योहानशी त्याच्या अनौरस मुलीचे म्हणजे डीनाचे लग्न कसे होऊ देता येणार नाही हे मांडतो. पण लोना हेसेल मुरब्बी बेर्निकचे सर्व समर्थन व प्रयत्न हाणून पाडते आणि नशीबाची साथ नसल्याने बेर्निकची इतर सर्व कारस्थानेदेखील निष्फळ ठरतात.

समाजाचे आधारस्तंभ पोखरलेले असतात किंवा असत्याच्या पायावर उभे असतात हे दाखवून सामाजिक टीका करण्याचे या नाटकाचे उद्दिष्ट आहे हे म्हणणे हे गुंतागुंतीचे नाटक खूप सोपे करून सांगण्यासारखे आहे. नाटक एका अभूतपूर्व कबुलीजबाबाने संपते. पण हा कबुलीजबाब कोणा ख्रिश्चन प्रिस्टपुढे दिला गेलेला नाही. तो दिला गेला आहे उघड्यावर, मोठ्याने आणि लोकांपुढे. जी मंडळी सत्कार आणि गौरव करायला आली आहेत त्यांच्यासमोरच बेर्निक पंधरा वर्षांपूर्वी त्याच्या हातून घडलेल्या पापाची, पापवजा कृत्यांची कबुली देऊन टाकतो. लोकांना काय प्रतिक्रिया व्यक्त करावी हे उमगत नाही. ते गांगरतात व परत जातात. म्हणजे सुरुवातीच्या घटना विशेष वाटतील अशा नसल्या तरी हा शेवटचा भाग अपूर्व आहे.

आणि हे अपूर्व नाटच घडून येते त्यामागची प्रक्रिया वेगळीच आहे. कायद्याचे वा राजकीय दडपण येते, कमिशन नेमले जाते म्हणून बेर्निक कबुलीजबाब देतो असे नाही. त्याच्या सद्सद्विवेकाला लोना जागे करते हे विशेष आहे. लोना जागे करू शकते याचे कारण तिच्यावर बेर्निकचे आणि बेर्निकवर तिचे प्रेम आहे ते पुनरुज्जीवित होते आणि त्याला कलंकित शोभा घेऊन जगणे शक्य नसते. कायद्याचा दट्ट्या आला म्हणून कबुलीजबाब दिला गेला असता तर ती कथा झाली असती आणि वास्तववादीही झाली असती; पण तिच्यातील काव्यात्म नाटच हरवले असते आणि ते नाटक वाचण्यात आज विशेषही वाटले नसते. आणि आपल्याकडे तर अशा 'केसेस' सध्या इतक्या झाल्या आहेत की त्यांचे खरोखरच कोणाला काही वाटले नसते. विशेष आहे ते याच्यामागे जे भावनांचे कल्लोळ-नाटच घडते ते. आणि ते खास इब्सेनी पद्धतीने थोरवी पावणारे आहे.

बेर्निकचा कबुलीजबाब हा लोनाचा मोठाच नैतिक विजय होय. ती कृतार्थ होते. तिने घडवून आणलेल्या पापविमोचनाबद्दल लोनाला उर्वरित आयुष्यात आधार देण्याचे बेर्निक वचन देतो आणि भावी समाजाचे खरे आधारस्तंभ स्त्रियाच असल्याचे बोलून दाखवितो. पण लोनाचे मोठेपण आणखी उजळते. ते कसे? तर भावी आधारस्तंभ स्त्रिया नसून 'सत्य' आणि 'स्वातंत्र्य' ही मूल्ये आहेत असे ती सांगते तेव्हा. म्हणजे विजयाच्या आणि आनंदाच्या अत्युत्कट क्षणीही इब्सेनच्या या अविस्मरणीय मानसकन्येचा तोल जात नाही. तिचा मूल्यविवेक खंबीर राहतो.

या नाटकातील बेटी आणि मार्था या इतर स्त्रिया त्याग करणे पत्करतात. परंतु लोना आणि डीना या 'स्वातंत्र्य' व 'सत्य' निवडतात. स्त्रियांनी धाडस दाखवून नवे जीवन निर्माण करायचे की पारंपरिक रूढींच्या काचात तसेच जखडून विफल जीवन जगायचे हा विषय इब्सेनने चार स्त्रीरेखा रंगवून मांडला आहे. बेटी आणि मार्था पारंपरिक त्यागाचा शरणसुलभ मार्ग पत्करतात खरे पण इब्सेनने त्यांचा उपहास केलेला दिसत नाही. मार्थाचा त्याग चेखोवियन धर्तीचा आहे. स्वतः वाढविलेल्या मुलीला ती तिचा प्रियकर देऊन टाकते नि स्वतः मागे सरते. उलट डीना नव्या पिढीतील पुढचा टप्पा आहे. तिच्याजवळ स्त्रीमुक्तीची दिशा तर आहेच पण 'प्रोग्रॅम' देखील आहे.

लोनाच्या स्वरूपात इब्सेनने त्याचे स्त्रीमुक्तीचे स्वप्नच जणू मांडले. आज हे स्वप्न काही कालबाह्य वाटणार नाही तरी ढोबळ मात्र वाटेल. पण इब्सेनच्या काळाला हा आदर्शवादी रंग पटला आणि लोना आवडली. वादग्रस्त वाटलेले नवे आधारस्तंभ–पिलर्स–लोना आणि बेर्निक– लवकरच लोकप्रिय झाले; इतके की इब्सेनला तोपर्यंत मिळालेल्या युरोपिअन कीर्तीचे लवकरच आंतरराष्ट्रीय पडसाद उमटू लागले.






नोरा, लिंडबाई, श्रीमती आल्विंग आणि रेजिना एंगस्ट्राण्ड या पुढील चार स्त्री-व्यक्तिरेखा लोना हेसेल-प्रमाणे स्त्रीमुक्ती आंदोलनाशी नाते सांगू शकतील अशा व्यक्तिरेखा आहेत. या साऱ्या व्यक्तिरेखा गाजल्या आणि 'डॉल्स हाऊस' व 'घोस्ट्स' या दोन्ही नाटकांनी इब्सेनची आंतरराष्ट्रीय कीर्ती पक्की केली. 'एनिमी ऑफ दी पीपल' मधील डॉक्टर स्टोकमान या संशोधक-नायकाची मुलगी पेत्रा ही नोरा आणि आल्विंग-बाईची वारसदार कन्या शोभावी अशीच आहे. पण त्या नाटकातील समस्याच वेगळी असल्याने, ती प्रामुख्याने पुढे येत नाही एवढेच.

नोरा आणि आल्विंगबाई स्त्रीमुक्तीच्या प्रतिनिधी ठरतात. याचे कारण स्त्रीमुक्तीसाठी पुरुषी वर्चस्वाची संपूर्ण समाजरचनाच पालटून टाकावी लागेल हे त्यांना कळते. लोना हेसेल ही खुद्द मुक्त स्त्रीच आहे. ती आदर्शवत् वाटावा असा नमुना आहे. इब्सेनची धडपड 'डॉल्स हाऊस' आणि 'घोस्ट्स' नाटकांतून नुसता स्त्रीमुक्तीचा विचार मांडण्याची नाही. तो विचार त्याने 'पिलर्स'मध्ये लोना आणि 'लीग'मध्ये सेल्मा यांच्या शब्दांतून व्यक्त केला आहे. येथे इब्सेन हा विचार जास्त जिवंत व मूर्त वाटणाऱ्या व्यक्तींमार्फत मांडू पाहतो आणि हा विचार मांडण्यासाठी या नायिका निर्माण केल्या गेल्या आहेत असे यत्किंचितही वाटणार नाही याची खबरदारी घेतो.

नोराला तिचे व्यक्तिरेखा म्हणून जिवंतपण तिने केलेल्या गुन्ह्याच्या, उघडकीला आलेल्या प्रकरणामुळे प्राप्त होते तर आल्विंगबाईंना त्यांचे जिवंतपण, नवऱ्याची स्मारक-वास्तू, तिचे जळणे आणि ओसवाल्डची शोकान्तिका यांमुळे होते. त्यांचे विचार नुसते मांडले जात नाहीत तर क्रिया-प्रतिक्रिया, नाटयमय घटना यांच्या प्रवाहात जिवंत रूप धारण करतात व त्यांच्या व्यक्तिमत्त्वांना ध्येयवादी उंची प्राप्त करून देतात.

माणसाच्या मनात मूलभूत बंडखोर विचारांचे कल्लोळ केव्हा उठतात? तर दारुण अनुभवांतून तो जातो तेव्हा. नेहमीची शांत परिस्थिती गवताच्या गंजी-प्रमाणे पेट घेते तेव्हा. नोराला ह्येलमारची नैतिक भूमिका आणि क्रोगस्टाडचे दडपण हे भडकवायला कारणीभूत होतात तर हेलेना आल्विंगला तिच्या मुलाचे रेजिनाशी वर्तन आणि पॅस्टर मॅण्डर्सचा सनातनी लब्ध-प्रतिष्ठितपणा हे भडकवायला कारणीभूत होतात. 'लोकापवादाचा' महाभयंकर ट्रोल आपण मारला नाही तर तो आपल्याला मारतो हे त्यांच्या पक्के लक्षात येते. 'लोकांना काय वाटेल' याची स्पष्ट कल्पना त्यांना ह्येलमार आणि मॅण्डर्स यांच्यावरून येते.

नोरा शिक्षित आहे. सुशिक्षित नसली तरी आपण काही ना काही व्यवसाय, नोकरी करू अशी उमेद तिला आहे आणि तीन पोरांची ती आई आहे. म्हणजे आपल्याकडे सहनशील पत्नीला लागणाऱ्या किमान अटी तिने पुऱ्या केल्या आहेत. या परिस्थितीतील स्त्री मला काऽही कमी नाही अशा मनःस्थितीत असते. पण नोरा अपवाद ठरते. शांत व आनंदी घरात एकदम वादळ निर्माण होते आणि वीजेचा कडकडाट व्हावा तशी गर्जून नोरा अंधाऱ्या रात्रीत दिसेनाशी होते. नोरा हे नाव (मूळातील नॉर्वेजियन नूरा) वलयांकित आणि अद्‌भुत ठरते.

ज्यामुळे हा 'इतिहास' घडतो तो नोराचा खरा गुन्हा तरी काय आहे? तो असा आहे– नवऱ्याला आजारपणातून वाचविण्यासाठी तिने १२०० डॉलर्स कर्ज क्रोगस्टाड या संशयास्पद चारित्र्य असणाऱ्या पण काहीशा परिचित इसमाकडून गुप्तपणे उसने घेतलेले आहे. गुप्तपणे म्हणजे कुणाही परिचिताला, अगदी नवऱ्यालादेखील कळू न देता. आणि विणकाम, भरतकाम करून तिने ते फेडतही आणले आहे. पण गोम ही आहे की कर्ज काढतेवेळी करारपत्रावर तिने जामीन म्हणून वडिलांची खोटी सही केली आहे व तारीखही खोटी टाकली आहे. वडील प्रत्यक्षात २९ सप्टेंबरला वारतात. पण हे माहीत नसलेली नोरा बाँडवर अगोदरच २ ऑक्टोबरची तारीख टाकते व सही करते. म्हणजे ही 'फोर्जरी' ची भानगड आहे. क्रोगस्टाडची बँकेतील नोकरी टिकावी म्हणून नोराने हेल्मरजवळ शब्द टाकावा असे त्याला वाटते. हे न केल्यास आपण पूर्वी घडलेला हा प्रकार हेल्मरला सांगू वा लोकांत जाहीर करू ही धमकी क्रोगस्टाड नोराला देतो. अर्थात तो सारा प्रकार हेल्मरला सांगतो पण नंतर लिंडबाईंच्या मध्यस्थीने मूळ कागदपत्रही हेल्मरला परत करतो. पण सामाजिक प्रतिष्ठा व कायदा मानणारा हेल्मर मध्यंतरी नोराला ताडताड बोलतो. त्याचे नोरावर प्रेम नाही हे नोराला कळते व कायद्याची बोच तिला विव्हल करते. नोराचे वडील गुन्हेगार-प्रवृत्तीचे होते हेही हेल्मर बोलून जातो. एकंदर प्रकारच असा

घडतो की नोराचा भडका उडतो. नोराच्या मनात सुप्तपणे आजवर खदखदत असलेले स्त्रियांची गुलामगिरी मोडून टाकण्याविषयीचे विचार उसळून बाहेर पडतात व नोरा 'घर' सोडून जाण्याचा निर्णय घेते. तो अमलातही आणते. कायदेशीर लग्न–कुटुंब–मुले यांना दूर सारून मग ती बाहेर पडते. हा एक ऐतिहासिक प्रसंग आहे. स्त्रीमुक्ती उद्दिष्ट housewife–गृहिणीच्या स्वातंत्र्याचा विचार करणे एवढेच नाही तर मुक्त-स्त्री –independent woman निर्माण करण्याचे आहे. अशा स्त्रीचे घर (फ्लॅट) **तिचे** असते आणि तिला होणारे अपत्य **तिचे** असते. ती पुरुषाच्या घरात राहात नसते तर तिला हवे ते पुरुष-स्नेही स्वतःबरोबर राहायला बोलावते. एखादा पुरुष ही दीर्घकालीन बांधीलकी ठरेलही. पण ती ठरविण्याचे स्वातंत्र्य तिला घेता येते.

खरी गृहिणी पैसेच मिळवीत नाही. ती नवऱ्याच्या पैशात जगते आणि त्यात वावगे खरोखरच काही नसते. ही ठळक श्रमविभागणी असते. नोराला हे स्थानच भयानक वाटले कारण त्यात खरे प्रेम नाही असे तिला दिसले. काही स्त्रियांना यात अपमानास्पद असे वाटणार नाही. त्यांना आपण गुन्हा केला होता असेही वाटू शकेल. आणि 'त्या' प्रसंगानंतरही त्या नवऱ्याशी जुळवून घेतील; किंबहुना मराठी–हिंदी चित्रपट, हे मोठ्या भावविवशतेने रंगवितील. सध्या हे चाललेच आहे. (उदा., तीसरी कसम)

जुन्या अर्थाने गृहिणी निर्माण न होऊ देता नव्या अर्थाने independent woman निर्माण करणे हे स्त्रीमुक्तीचे ध्येय असल्याने 'डॉल्स हाऊस' हे पहिल्या टप्प्यावरचे नाटक ठरते. 'सहजीवनाची' कल्पना त्यात अभिप्रेत नाही कारण त्या वेळी ती आलीच नव्हती. पारंपरिक गृहिणी या आदर्शावर केलेला हा आघात होता. 'मादाम नोवारी' व 'कारेनिना' असेच पण अप्रत्यक्ष आघात होते. पण इब्सेन हा फ्लोबेर किंवा टॉलस्टॉयपेक्षा महत्त्वाचा ठरतो कारण त्याने self-realization ची संकल्पना वापरली आहे. नोरा रोमँटिक व स्वच्छंद प्रेयसी नाही तर नवा सामाजिक विचार असलेली नायिका आहे. एरवी तिने डॉ. रँकशी नुसते विवाहबाह्य संबंध ठेवले असते.

'नोरा' जशी घराबाहेर पडली त्याप्रमाणे आल्विगबाई तरुणपणी बाहेर पडू शकल्या असत्या. पण त्याचे कारण नवऱ्याचा व्यसनी व स्त्रीलंपटपणा हे झाले असते. आल्विगजवळही स्त्रीमुक्तीचा विचार आहे पण धाडस नाही. त्यामुळे त्या कोंडमारा सहन करण्याचा निर्णय घेतात. पॅस्टर मॅण्डर्स त्यांचे प्रेम अव्हेरतो त्यामुळे हा कोंडमारा आणखी वाढतो. आल्विगबाई धुमसत राहतात. असाच निर्णय "असं घडलंच कसं' मधली नायिकाही १९८६ मध्ये घेताना आपण पाहतो. तेथील "तत्त्वज्ञान" वेगळे आहे एवढेच. शेकडो मराठी स्त्रिया आजही धुमसतच राहातात, परंतु मुलगा 'ओसवाल्ड' वडिलांच्याच वाटेने जातो आहे हे पाहिल्यावर पॅस्टर मॅण्डर्ससमोर आल्विगबाई निदान सारा संताप व्यक्त तरी करतात. पण जे आल्विगबाई करू शकत नाहीत ते करण्याचा चंग त्यांनी लहानाची मोठी केलेली 'रेजिना' बांधते. रेजिना ही तिच्या आईला श्रीयुत आल्विगपासून झालेली (अनौरस) मुलगी आहे. आणि आता तिच्या वारलेल्या आईचा नवरा म्हणजे सुतार एंगस्ट्राण्ड हा तिला 'धंद्याला लावण्याचा' इरादा बाळगतो आहे. अर्थातच रेजिना बंड करून उठते. ओसवाल्ड हा तिचा नवरा होऊ शकत नाही कारण तो तिचा सावत्र भाऊच आहे. ही घटनादेखील आगीत तेल ओतण्यासारखी ठरते. रेजिना 'आल्विग' यांचे घर सोडून जाण्याचा निर्णय घेते व घराबाहेर पडते. रेजिना नोराची 'बहीण' ठरते.

पण स्त्रियांमधील बंडखोरी ह्य तऱ्हेने रंगविणारा इब्सेन वास्तवातील काही विसंवादी घटनाही चित्रित करतो. लोना हेसेलसारखीच वाटावी अशी व्यक्ती 'डॉल्स हाऊस' मध्ये आहे. ती म्हणजे स्वतःच्या पायावर उभी असलेली आणि प्रत्यक्षात स्त्रीमुक्ती जगत असलेली तरुण विधवा लिंड ही होय. खरे म्हणजे, न कळत का होईना, तिचा प्रभाव नोराला बंडखोरीला उद्युक्त करतो; पण ती मात्र उफराटी दिशा स्वीकारते. दस्तयेवस्कीय कादंबरीविश्वात शोभावी असा निर्णय घेते. क्रोगस्टाड या मुलंबाळं असलेल्या परंतु सामाजिक प्रतिष्ठा नसलेल्या, संशयास्पद व्यक्तीशी लग्न करण्याचा ती विचार करते. नुसते विवाहबंधनच नाही तर काही पोरांची जबाबदारी स्वीकारते. एकाकी जीवनाला कंटाळल्यामुळे ती हा निर्णय घेते असे इब्सेन दाखवितो. नाटकातील हा विसंवादी सूर ठरतो. अशा प्रकारचे पर्यवसान दाखविण्यामागे इब्सेनचा हेतू काय असावा हे तितकेसे स्पष्ट होत नाही. तसेच म्हटले तर डॉ. रँक हाही एकाकी जीवनाला कंटाळलेला आहेच आणि

लिंडबाई व रँक एकत्र येतात हे दाखविणे कठीण नव्हते. पण रँक तसाच आत्महत्येप्रत जातो. इब्सेनी वास्तव-वाद कसा आणि किती गडद होतो पहा !

'वाईल्ड डक' नाटकापासून इब्सेनच्या एकंदर भूमिकेतील बदलच जाणवायला सुरुवात होते. नाटकातील स्त्री-पुरुष व्यक्तिरेखा वैचारिक सूत्रांशी बांधल्या गेल्या आहेत असे ठळकपणे वाटेनासे होते. पुरुषांप्रमाणेच स्त्री-व्यक्तिरेखाही जीवनातील खोल पाण्याकडे आपल्याला घेऊन जातात. जीवनातील इर-रॅशनल, अ-तार्किक अंगे चाचपडली जातात. 'रोझमर्स-होम'-मध्येही रिबेका वेस्टसारखी कणखर वैचारिकता असणारी नायिका आहे. नाही असे नाही. परंतु ह्या वैचारिकतेचा विजय होण्याऐवजी ती वितळून कशी जाते हे रंगविले जाते. वैचारिक बंडखोरी, आव्हान-प्रति-आव्हान यांपेक्षा व्यक्तिमत्त्वांची गुंतागुंतीची जडण-घडण रंगविणे आणि त्यांचे मनोविश्लेषण यांच्यावर भर दिला जातो. इब्सेनच्या शब्दांत त्याच्या व्यक्ती सामाजिक ट्रोल्सशी झगडण्याऐवजी अंतरंगातील ट्रोल्सशी झगडू लागतात.

विशेष म्हणजे 'वाईल्ड डक'ची प्रमुख व्यक्ती या अर्थाने नायिका, हेदविग ही चौदा वर्षांची मुलगी आहे. 'एनिमी' मधील डॉ. स्टोकमानची मुलगी पेत्रा ही व्यक्तिरेखा इब्सेनमधील बदलाची चाहूल देते. पण हेदविग, एक असामान्य व्यक्तिरेखा म्हणूनच आपल्या-समोर येते. वडील संकटात असताना 'प्रार्थना' करणारी हेदविग, त्यांना फोटोग्राफीच्या व्यवसायात जमेल ती मदत करू पाहणारी हेदविग, 'वनहंसी'साठी तिने पाळलेल्या रानकोंबडीसाठी देखील प्रार्थना करते आणि 'निष्प्रेम' कलंकित जीवन आपल्यासमोर आऽ वासून उभे आहे हे जाणवताच आत्महत्या करते. म्हाताऱ्या आजोबांना आपली नात कोणत्या कारणासाठी पिस्तुला-बाबत प्रश्न विचारते आहे हे कळत नाही व ते नको ती माहिती तिला देऊन जातात. वनहंसीला मारणे म्हणजेच हेदविगचा आत्मा नष्ट करणे हे सरळ सत्यही मूर्ख ग्रेघर्सला उमगत नाही व तो वनहंसीला ठार मारण्याचा हेका हेदविगजवळ धरून बसतो.

घटनाच अशा घडत जातात की, आपण अनौरस संतती आहोत आणि आपणच आपल्या आई-वडिलांच्या संसारातील कालविलेले विष आहोत हे हेदविगला उमगते, आणि अगतिक होत होत ती आत्महत्येच्या निष्कर्षाप्रत जाते. करुण आणि भयावह आहे ते तिचा निश्चय हळूहळू पण निश्चित होत जातो आणि तो तसा होणे कोणी थांबवू शकत नाही हे. दस्तयेवस्कीच्या कथाविश्वातील वाटावी अशीच ही घटना आहे व व्यक्तिरेखा आहे. हेदविगचे भावविश्व अननुभवी आणि कोमल आहे. त्या भावविश्वात तिला खंबीरपणा देण्याचे सामर्थ्य कशातही नाही हे वाचक–प्रेक्षकांनाही अचानकच अखेरीस कळते. हेदविग हळूहळू एकाकी होत जाते व शेवटी संपूर्ण अगतिक होते. गुंतागुंतीने तर तिचे मन चिरडूनच जाते. तिचा मृत्यू–आत्महत्या–प्रातिनिधिक नाही पण चिरडली जाणारी निरागसता, सर्जनशीलता आपल्या सरळ मनाच्या गाभ्यातच जाऊन पोहोचते. ओसवाल्ड आणि हेदविग त्यांच्या शोकान्तात बहीण–भाऊ शोभावेत असे आहेत.

"She is a victim like Ophelia in Hamlet and almost an accidental victim." हे ब्रायन डाऊन्सचे उद्गार[१] समर्पक आहेत. कारण हेदविगचे प्राणार्पण आफेलियाच्या प्राणार्पणाप्रमाणेच नाटकातील प्रमुख घटनेची परिणती नाही तर अनपेक्षित परिणाम आहे. एक अनपेक्षित धक्का देणारा शेवट म्हणूनच ते येते. अर्थात त्यामुळे शोकात्म परिणामाची उत्कटता व धीरोदात्तता काही कमी होत नाही. आपण 'Blows 40' सारखी फिल्म पाहतो तेव्हाही आपल्याला हेदविग आठवते. इब्सेनने आपले लक्ष वयाने वाढलेल्या परिपक्व माणसांच्या वर्तनाचे भलतेच परिणाम निष्पाप मुलांवर होऊ शकतात इकडे जसे कौशल्याने वळविले आहे तसेच याही फिल्ममध्ये ते वळविले जाते. तिच्यात कोवळा छोटा मुलगा समुद्रात जीव देतो ही फिल्मही एक अप्रतिम कलाकृती आहे. अर्थात ही फिल्म समुद्रातच बुडून मरणाऱ्या लिट्ल इयोल्फला जास्त जवळची आहे असे दिसते.

इब्सेनने हेदविगमध्ये स्वतःच्याच बालपणीच्या अवस्थेचे, म्हणजे आपल्या आईचे आपण अनौरस अपत्य आहोत या वदंतेने झालेल्या स्वतःच्या त्या वेळच्या कोंडमाऱ्याचे चित्रण केले आहे. हेदविगबाबतचे तपशील व तिने उल्लेखिलेली पुस्तके आणि इब्सेनच्या शिएन (स्कीन) मधील घरातील तपशील व पुस्तके जुळणारी आहेत असे चरित्रकार सांगतात. हेदविगचे अपयशी आजोबा म्हणजे खुद्द इब्सेनचे वडील आणि बेर्लेसाहेब म्हणजे इब्सेनच्या आईशी–मार्केनशी लग्नाआधी संबंध

असणारा व्यापारी, हेही जुळणारे आहे. पण इब्सेन बहुतेक नाटकांतून तो स्वतः ज्या प्रसंगांतून गेला होता त्यांचा वापर करीत असे आणि त्यामुळेच त्याच्या अनेक नाटकांना व व्यक्तिरेखांना उत्कट जिवंतपणा लाभला आहे हे उघड गुपित आहे. कसेही असो, इब्सेनचा वाचक किंवा प्रेक्षक त्याची 'हेदविग' कधी म्हणजे कधीही विसरू शकणार नाही हे खरे.

हेदविगची आई गीना एकदाल हीदेखील अशीच अविस्मरणीय आणि हृद्य व्यक्तिचित्र आहे. नोराने फोर्जरी केली आहे आणि तो गुन्हा दडविला आहे तर गीनाने लग्न होण्याआधी काही दिवस बेर्लेसाहेबांशी शरीरसंबंध ठेवले होते हा गुन्हा केलेला आहे व तो तिच्या नवऱ्यापासून– यालमारपासून– दडविला आहे. दोघींच्याही बाबतीत रहस्ये फुटतात आणि दोघींनाही धीरोदात्तपणे शोकांतिकांना सामोरे जावे लागते. (अमेरिकन माणसांना गीनाचा गुन्हा आणि त्याचा एवढा गहजब आजोबांच्या (इब्सेनच्या) नाटकातील पात्रे का उडवतात हे आज उलगडणे कठीण वाटेल; तर भारतीय प्रेक्षकांची गीनाने केलेल्या पापाला नियतीने प्रायश्चित्त दिले येथपर्यंत मजल जाऊ शकेल.) पण दोघीही धार्मिक संदर्भांचा वापर स्वतःच्या वाट्याला आलेल्या परिस्थितीचा अन्वयार्थ लावण्यासाठी करीत नाहीत कारण त्या आधुनिक शोक-नायिका म्हणून रंगविल्या आहेत.

'We must help one another. Now we have equal share in her, haven't we?' हे गीनाचे अगदी अखेरीस येणारे उद्‌गार आहेत आणि ते दुःख सोसायचे तरी कसे असे शोकाकुल होऊन विचारणाऱ्या यालमारला उद्देशून उच्चारले गेले आहेत. नोरा आणि गीना दोघीही आधुनिक स्त्रियांच्या व्यक्तिरेखाच आहेत; पण त्यांच्या निर्णयक प्रतिक्रियांतील फरक विचार करावा तेवढा गुंतागुंतीकडे नेणारा आहे. गीनामध्ये जे जीवनाचे आकलन व सामंजस्य आपल्याला दिसते ते पुन्हा पुढे एकवार एलिदात दिसून येते आणि स्त्री-मुक्तीतील संपूर्ण निर्णयस्वातंत्र्याची समस्या असूनही दिसून येते. आणि याचे प्रमुख कारण हे की प्रखर वैचारिकता आणि एकंदर सामाजिक अन्यायाची जाणीव. दोघींच्याही व्यक्तिमत्त्वांत ठळक घटक नाहीत. गीनात तर नाहीतच.

'वाईल्ड डक' पासून पुढील नाटकांतील प्रमुख स्त्री-व्यक्तिरेखा म्हणजे, रिबेका वेस्ट, एलिदा, हेदा गाब्लर, हिल्डा वांगेल, एला रेन्थहाईम, इरीना या उत्तरोत्तर जास्त गडद, विचित्र आणि शोकात्म होत जाताना दिसतात. त्यांच्या दुर्दैवाला आणि दुःखांना सामाजिक दडपण आणि भोवतालची संबंधित माणसे कारणीभूत असतातही; पण त्यांचे दुःख 'स्त्रीजन्मा ही तुझी कहाणी' म्हणून मांडले जात नाही तर मूलभूत मानवी अस्तित्वाच्याच स्तरातून ते झऱ्यांसारखे वा उद्रेकांसारखे वाहते. स्त्री-मुक्तीच्या सामाजिक संदर्भाला डावलून नव्हे, पण त्याच्या पलीकडे जाऊन काही मांडण्याची यशस्वी पराकाष्ठा इब्सेनची प्रगल्भ सर्जनशीलता करते. आई, बहीण, पत्नी, मुलगी ही रक्ताची नाती अपुरी पडत असल्याची जाणीव या दुःखांच्या सावलीत आपल्याला होते.

'रोझमर्स होम' मधील रिबेकाच्या विचारविश्वात 'स्वातंत्र्य' ही कल्पना प्रमुख आहे. जुन्या रूढी, परंपरा यांना दूर सारून आपण स्वतंत्र झालो तर आपल्याला नवी 'खानदानी' nobility निर्माण करता येईल या तिच्या विचाराकडे ती रोझमरसारख्या पॅस्टरला वळविते. तिचे संभाषणचातुर्य निर्णायक ठरत जाते. बीटासारख्या न्यूनगंडाने पछाडलेल्या स्त्रीला ती मोठ्या शिताफीने व न दुखवता ती रोझमरच्या मार्गातील धोंड कशी आहे ते दाखवून देते. परंतु हे करत असताना आपल्या अंगावर काहीही शेकणार नाही याची काळजी घेते. बीटा स्वतः निपुत्रिक असल्याने व तशीच राहणार असल्याने ती रिबेकाला वरचढ होऊ देते. रिबेकाचे रोझमरवर प्रेम आहे. त्याचे मतपरिवर्तन व तिच्या प्रेमात गुंफले जाणे समांतरपणे घडत जातात. पण रिबेकाच्या जीवनाला बीटाच्या आत्महत्येने कलाटणी मिळते. बीटाच्या आत्महत्येला रिबेका कारणीभूत झालेली असल्याने तिच्या मनात पापभावना घर करते आणि ती इतकी प्रबळ होते की रिबेकाचे आधुनिक बंडखोर विचार वितळून जातात. पापक्षालनासाठी ती स्वतःच जलसमाधी घेते आणि या कृत्यात ती रोझमरलाही सामील करून घेते.

"This is not the story of crime and punishment
But of sin and expiation"
(The Family Reunion)





ह्या टी. एस्. एलियटच्या काव्यपंक्ती रिबेका– रोझमर संबंधाच्या बाबतीत आढळतात. एका पातळीवर रिबेकाची कथा ही क्राईम-स्टोरीच आहे. बीटाचा भाऊ रेक्टर क्रॉल हा रिबेकाकडे गुन्हेगार आणि रोझमरकडे धार्मिक गुन्हेगार म्हणूनच पाहतो आणि रोझमरला त्याच्या वर्तमानपत्रातून झोडण्यापर्यंत मजल गाठतो. पण दुसऱ्या पातळीवर रिबेका–रोझमरची कथा पाप आणि पापक्षालनाची कथा ठरते. रिबेका स्वतःच स्वतःला शासन करून घेते. जलसमाधी घेऊन पापाचे प्रायश्चित्त घेते. हा साराच भाग अद्‌भुत आणि विलक्षण आहे. कलाकृती म्हणून ‘ रोझमर्स होम ’ आणि व्यक्ति-रेखा म्हणून रिबेका–रोझमर दस्तएवस्की, शेक्सपीयर यांची आठवण करून देतात. बदल आणि परिवर्तन या कल्पनेवर रोझमर्स होममधील रिबेकाच्या कृती ‘ गूढ ’ वाटावे असे भाष्य करतात आणि बीटाच्या आत्महत्येत नकळत का होईना आपणही सहभागी आहोत हे स्वतःच्या कृतीतून अखेरीस रोझमर मान्य करतो. आनंदी जीवन अशक्य आहे हे दोघांनाही उलगडते व ते एकत्रित मरण पत्करतात.

रिबेकाची व्यक्तिरेखा अत्यंत मनोवेधक पण तित-कीच गुंतागुंतीची आहे. पृथ्वीच्या अतिउत्तरेकडील प्रदेशातून–फिनमार्कमधून आलेली ‘ रिबेका ’ आपल्या नेहमीच्या आकलनापलीकडे आहे असे वाटत राहते. सिग्मंड फ्रॉईडने रोझमर्स होम, रिबेका यांची वाखाणणी केली आहे व ईडिपसगंडाच्या दृष्टीने त्याचे मनोविश्ले-षणही केले आहे.[३] डॉ वेस्ट आणि रिबेकाची अनपढ आई यांचे लैंगिक संबंध असतात. पुढे आईची जागा मुलगी घेते. आईच्या पतीशी म्हणजे पर्यायाने सावत्र वडिलांशी संबंध आल्याने रिबेकाच्या मनात अपराध-भाव–guilt–निर्माण होतो. तिला दुसऱ्या पुरुषांविषयी लैंगिक आकर्षण वाटेनासे होते आणि तिचे विचारही डॉ. वेस्टप्रमाणेच मुक्त, पाखंडी व बंडखोर होतात.

रोझमर तिला वडील शोभेल इतका वयस्क नाही हे खरे पण त्याच्या व्यक्तिमत्त्वात एक प्रकारचे वार्धक्य आहे. रोझमर–रिबेका यांचे संबंध इडिपसगंडाचीच आवृत्ती आहेत. बीटाची जागा घेताना रिबेकाच्या मनात संघर्ष निर्माण होतो. हाताखालच्या स्त्रिया माल-कीणीची जागा घेण्याचे स्वप्न बाळगतात, विणतात असेही फ्रॉईडने म्हटले आहे. रोझमरविषयी सुप्त का होईना लैंगिक आकर्षण आहे म्हणूनच बीटाला मृत्यूकडे लोटण्याचा प्रयत्न रिबेका करते. फ्राईडचे विश्लेषण भेदक आणि उद्‌बोधक आहे व ते मुळातून पाहण्या-सारखे आहे. अर्थात फ्रॉईडने विश्लेषण फार तपशील-वार करायचे टाळले आहे. कारण ते त्याच्या अनुयायाने ऑटो रँकने त्याच्या ‘ डास इन्सेस्ट मोटिफ इन डिश्टुंग उंड झाग्‌अ् ’ (१९१२) या ग्रंथात केले आहे.

रिबेकाची शोकान्तिका नेमकी कशात आहे ? तिच्यात धैर्योदात्त-हिरॉईक असा व्यक्तिमत्त्वाचा घटक आहे. रोझमर्स होमच्या परिसरात खरे म्हणजे ती राज-कारणात, समाजकारणात क्रांतिकारक समाजवादी विचार फैलावण्यासाठी आली आहे. लोना हेसेल किंवा नोरा, किंवा पेत्रा स्टोकमान यांच्या वाटेवरची ती प्रवासी आहे. मग ती अपयशी का होते आणि आत्म-हत्या तरी का करते ? याला सरळ असे काही उत्तर आहे का ? सरळ असे उत्तर हे दिसते की ती एकाकी आहे. तिच्याजवळ पुरोगामी बंडखोरीच्या कल्पना आहेत परंतु **तिच्यामागे** व्यक्तिरूपी आदर्श, पार्टी किंवा स्नेहीमंडळींचा गट नाही. भूतकाळ, बालपण संशयास्पद नसावे हे खरे पण ते तसे असले तरी आदर्श किंवा पक्ष किंवा गट तुमच्यामागे असला तर एक-प्रकारचे मानसिक बळ प्राप्त होते. हे बळ रिबेकाच्या मागे नाही. बीटाची प्रत्यक्ष आत्महत्या, क्रोलचा प्रति-कार, रोझमरची क्षीण-लैंगिकता असण्याची शक्यता या गोष्टी एकामागून एक येतात नी रिबेकाचे विधायक मनोधैर्यच खचवून टाकतात. तिचे स्वतःच्या सामर्थ्या-विषयीचे अंदाज चुकतात. तिला वाटते त्यापेक्षा ती कमी समर्थ, ठोस आहे. रोझमर दुबळा आहे हे खरे पण त्यामुळे रिबेका कुठल्याही परिस्थितीत समर्थ आहे असे ठरत नाही. हेल्सेथबाईंनी शुभ्राश्वांचा हवाला देऊन सारेच प्रकरण गूढ, अंधश्रद्धेने भारलेले असे केले आहे. पण ते आपण तसे स्वीकारले नाही तरी रोझमर्स होम आणि रिबेका यांच्याभोवतीचे गूढ वलय शिल्लक उरतेच. गुन्हेगार प्रत्यक्ष गुन्ह्यानंतर एकदम मानसिक दृष्ट्या खचतात हे काही बाबतींत जरी खरे मानले असते तरी गुन्हेगार एकदम आत्महत्येप्रत जावा हे सकृत्‌दर्शनी तरी मनाला पटणारे नाही. रिबेका आणि रोझमर या दोघांची एकाच वेळी जलसमाधी घेणे अतिशय अपवादात्मक घटना राहते व ते रिबेकाच्या शोकान्तिकेभोवतीही गूढता निर्माण करते.

रिबेका आत्महत्यारी व्यक्तिमत्त्व ठरते त्याच-प्रमाणे हेडा गाब्लरही ठरते. रिबेका प्रियकराला– रोझमरला बरोबरच घेऊन मरते तर हेडा तिच्या प्रियकराला– ल्योनबर्गला आत्महत्या करायला लावते. 'सुंदरपणे मरायला' उद्युक्त करते. दोघीही़जणी कमालीच्या वैफल्यापोटी, अगतिकतेपोटीच आत्महत्या करतात. इच्छित प्रियकराबरोबर मिलन होणे अशक्य-प्राय आहे हे दोघींचेही आंतरिक जीवन विषारी करून टाकतात. फरक दिसतो तो ह्यात की रिबेका खालच्या वर्गातून आलेली आहे तर हेडा ऱ्हास पावत असलेल्या उच्चभ्रू खानदानी वर्गातील आहे. रंगभूमीच्या दृष्टीने रिबेका हीदेखील आव्हान देणारी भूमिका आहे पण एकं-दर नाटक रंगभूमीवर पकड घेत नाही. उलट 'हेडा' ही रंगभूमीच्या दृष्टीने तर आव्हान देणारी भूमिका आहेच पण एकंदर नाटकही रंगभूमीवर आजतागायत गाजत आलेले आहे. हेडा ही रिबेकापेक्षा जास्त 'नाटचमय' भूमिका आहे.

वैफल्य आणि मत्सर यांनी हेडा ग्रासलेली आहे. टेसमानशी घडलेला विवाह तिच्या दृष्टीने वैफल्याचे कारण आहे तर एके काळचा प्रियकर होऊ शकला असता असा मित्र आयलट हा यशस्वी होऊन थेआ ह्या तिच्या मैत्रिणीबरोबर 'सहजीवन' जगतो आहे ह्यामुळे मत्सर आहे. या दोन भावना अत्यंत तीव्र आहेत. रिबेकाच्या बाबतीत वैफल्य हे नंतर येते तर हेडाच्या बाबतीत वैफल्य सुरुवातीपासूनच आहे. रिबेकाचे मूळ आडनाव गानविक हे आहे. 'गान' म्हणजे जादूटोणा, मंत्र-तंत्र. म्हणजे गानविक हे नाव तिचे प्रभाव पाडण्याचे सामर्थ्य सूचित करते. हेडा ही गाब्लर आहे. तिचे वडील लष्करी जनरल होते आणि गाब्लर हे जर्मन नाव आहे. हे नाव हेडाचे विध्वंसक सामर्थ्य सूचित करते. हेडाच्या मनाची जडणघडण लष्करी संस्काराखालची आहे. परिस्थितीत हेडा गोळीबार करणार आणि शस्त्र चालविणार हे ध्वनित केले जाते. रिबेकाजवळ विधायक सामाजिक हेतू आहेत तर हेडा भोगवादी नसली तरी फक्त सुखवादी आहे. तिला सामाजिक भान नाही आणि ज्या साहित्यिक वातावरणात ती लग्न करून आलेली आहे त्याविषयी तिला जिव्हाळा नाही. इतिहाससंशोधक नवरा हा तिचा आधार असला तरी आनंदाचा स्रोत नाही. हेडा देखणी आहे आणि या सौंदर्याच्या जोरावर ती पूर्वी पार्टर्यातून चमके. तिला अनेक चाहाते मित्रही होते. ल्योवबर्ग त्यांपैकीच एक. त्यांची मैत्री असते पण प्रेम जमत नाही. प्रेम व्यक्त करायचे आणि लग्नाचे विचारायचे धाडस येलर्टचे कधी होत नाही कारण मोठ्या घरातील हेडा आपल्याला कशी झेपणार हीच भीती त्याला असते. यातूनच हेडा मनापासून न आवड-लेल्या योर्गेन टेसमानशी लग्न करते आणि दुःखाला सुरुवात होते.

केवळ स्वतः आत्महत्या करून हेडा या जगातून निघून गेली असती तर हेडा अविस्मरणीय ठरलीही नसती. ती तशी ठरते कारण ती विशिष्ट परिस्थितीचा फायदा घेऊन ल्योवबोर्गचाही आनंद नष्ट करते आणि त्याला आत्महत्या करायला लावते. ल्योवबर्ग व त्याची प्रेयसी थिआ एल्वस्टेड या दोघा 'कॉम्रेड्स्' मध्ये ती दुरावा निर्माण करते. आणि त्याला अगतिक करते.

ल्योवबोर्ग आत्महत्या करतो कारण त्याचे मौल्य-वान हस्तलिखित हरवते, त्याचा पार्टीत तोल जातो आणि पोलीसांपर्यंत प्रकरण जाते आणि त्याच्या लक्षात येते की हेडा एक काळ त्याच्यावर जवळ जवळ प्रेम करत होती आणि त्याने हिय्या केला असता तर त्याला ती मिळाली असती. वैतागलेल्या व पूर्ण भंगलेल्या मनःस्थितीत असताना हेडा त्याला पिस्तूल देते आणि पुढे ल्योवबोर्ग आत्महत्या करतो.

हेडा आत्महत्या करते कारण ती सर्वस्वी 'बोअर' झालेली आहे तिला आपला नवरा स्पर्धेत मागे पडतो आहे आणि इतिहासकार म्हणून ल्योवबोर्गचे नाव गाजते आहे हे सहन होत नाही. थिआबद्दल तिला गडद मत्सर वाटतो. ल्योवबोर्गने आत्महत्या केली आहे हे निश्चित कळताच ती स्वतःवर (कानशिलात) पिस्तूल झाडून घेते. ती **थिआ**वर सूड उगवते आणि स्वतःलाही शासन करते. हेडाच्या आत्महत्येत आणखी एक धागा आहे. ब्राक हा वयस्क न्यायाधीश हेडावर डोळा ठेवून आहे. हेडाने पिस्तूल ल्योवबर्गला दिले हे त्याला माहीत आहे. आणि उद्या खटला सुरू झाला तर आपण ब्राकच्या तावडीत आहोत ही शक्यता हेडाला बिथरवून टाकते. शिवाय ल्योवबर्गच्या मृत्यूमुळे थिआ आणि योर्गेन एकत्र येऊ शकतील ही आणखीही शक्यता तिला अस्वस्थ करते. आणि परिणामी हेडातील विध्वंसकता स्वतःवरच उल-टते. ब्रॅडब्रुकबाईंनी हेडाला दिलेली नागिणीची उपमा

चूक आहे. हेडाचे वर्तन स्वतःलाच नांगी मारून घेऊन ठार होणाऱ्या विंचवासारखे म्हटले पाहिजे.

हेडामध्ये उदात्तीकरणाची शक्यता नाही. ती आत्मकेंद्री आणि गर्विष्ठ आहे. ती स्वतःखेरीज दुसऱ्या कशाशीच एकरूप होत नाही. आणि खरे म्हणजे ती प्रेम करण्याचे सामर्थ्य नसलेली सुंदरी आहे. ख्रिश्चन धर्मसंस्कारांपेक्षा आदिम नॉर्डिक परंपरेशी आणि लष्करी वीरवृत्तीशी तिचे नाते आहे. त्याचमुळे दुबळ्या योर्गेनचा गर्भ पोटात असण्याची नुसती शक्यताही तिला पूर्णपणे अगतिक करते. संदर्भ आणि वातावरण आधुनिक असले तरी हेडा म्हणजे सागाकाळातील ह्योर्दिसचीच नवी आवृत्ती होय. एकदा लग्न झाल्यावर पतीशी अप्रामाणिक होऊन काही विवाहबाह्य संबंध जोडण्याची कल्पना दोघींनाही स्पर्श करत नाही.

हेडाला कोणी भाऊ-बहीण नाहीत. आई-वडील दोघेही वारलेले आहेत. म्हणजे रिबेकासारखीच ती एकाकी आहे. तीही कोणाला जवळचे मानू शकत नाही, आणि तिचे मन खऱ्या अर्थाने त्या व्यक्तीजवळ मोकळे करू शकत नाही. योर्गेन पुस्तकी असला तरी याच्या उलट आहे. त्याच्या आत्याचा ह्याला लळा आहे आणि त्याच्या नोकरांशी त्याचे संबंध जिव्हाळ्याचे आहेत. हेडाला अशा प्रकारची नाती असणे म्हणजे दुबळेपणा वाटतो. ती पूर्ण व्यक्तिवादी आहे पण तो व्यक्तिवाद विधायक आविष्कारात फुललेला, उमललेला नाही. स्वतःला नक्की काय काय हवे हे तिला कळत नाही आणि कळले तर फार उशिरा. तिचे वैफल्य मात्र निश्चित आहे. मूल, लैंगिक स्वैराचार, सत्ता, कीर्ती यांचे तिला आकर्षण नाही. 'Free act', मुक्त कृती हे तिचे शब्द आहेत पण ते पोकळ आहेत; त्यांना रचनात्मक असा आशय नाही. योर्गेन हा भूतकाळात रमलेला आहे. पण हेडाला भूतकाळाचे, इतिहासाचेही आकर्षण नाही. ती वर्तमानात जगणाऱ्यांपैकी एक आहे. आणि हा वर्तमानकाळ तिला 'निरुत्तर' करणारा आहे. तिला जीवनाचा तिटकारा आलेला वाटतो. कारण तिची लगतच्या तारुण्यातील अस्फुट स्वप्ने विरलेली आहेत. तिची कृत्ये विचारातून होत नाहीत तर ऊर्मीतून होतात असे इब्सेन दाखवितो पण या उत्स्फूर्ततेत, ऊर्मीतून वागण्यात वेडसरपणाची झाक आहे असेच आपल्याला वाटू लागते. कोणी तिला काही समजावून सांगेल का? तिच्याशी वादविवाद करून आपला मुद्दा पटवून देऊ शकेल का? शक्यता नाही. तिची जडणघडणच अशी आहे की तिचे अनेक अन्वयार्थ लावता येतात. (आणि यामुळे ती अनेक समर्थ नटयांना आगळीवेगळी आणि आव्हान देणारी भूमिका–रोल–वाटते.)

रिबेका आणि हेडा यांचीच पुढील अविस्मरणीय आवृत्ती म्हणजे हिल्डा वांगेल. रिबेका रोझमरला स्वतःबरोबर जलसमाधी घ्यायला लावते. हेडा प्रियकराला आत्महत्या करायला लावते व स्वतःही कानशिलात पिस्तुलाची गोळी मारून आत्महत्या करते. तर हिल्डा, तिचा प्रियकर आर्किटेक्ट-इंजिनीअर सोलनेस याला मृत्यूप्रत नेते. उंच टॉवरवरून खाली कोसळण्यास उद्युक्त करते व तसेच घडतेही. तिचे स्वतःचे पुढे काय होते हे आपल्याला कळत नाही. स्वतःला प्रियतम वाटणारी व्यक्ती स्वतःला प्राप्त होणार नाही असे उमजता त्या व्यक्तीलाच नष्ट करण्याच्या 'ह्योर्दिस' प्रकारच्या स्त्रीपरंपरेतील हिल्डा हा शेवटचा आविष्कार होय. हिल्डादेखील दुसऱ्याच्या इच्छाशक्तीवर स्वतःच्या इच्छाशक्तीची हुकुमत चालवू शकते.

रिबेकाला बीटाचा आणि हेडाला थेआ एल्वस्टाडचा मत्सर वाटतो आणि त्यांच्या विध्वंसक वृत्तीत त्याचा निश्चित भाग आहे. हिल्डाला अशा प्रकारचा मत्सर सोलनेसच्या पत्नीबद्दल वाटतो असे कोठेही दिसत नाही. आणि ती ज्याच्यावर तिच्या इच्छाप्रभावाचा प्रयोग करते तो सोलनेस तिला बाप शोभावा असा आहे. तिच्या आकर्षणात लैंगिकतेपेक्षा ट्रोलसदृश विध्वंसकतेचाच भाग सौंदर्याचेच रूप घेऊन येताना दिसतो. स्त्रीसौंदर्य हे विनाश घडविण्यास कारणीभूत होते ही अपश्रद्धा जुनी, किंबहुना प्राचीन आहे. तिचा नवा आविष्कार हिल्डात पाहायला मिळतो. हिल्डा कोवळी तरुणी आहे. तिला गिरिभ्रमणाची आवड आहे आणि आपल्या व्यक्तिमत्त्वाची दुसऱ्यावर छाप पडू शकते इतपत तिला निश्चित आत्मविश्वास आहे. तिला तिच्या वयाचे मित्र किंवा चाहाते नसतीलच असे नाही पण त्यांचा संदर्भ नाटकात आपल्यासमोर येत नाही. पण ती एकाकी नाही. आई-वडील, भाऊ-बहीण यांच्यातून ती आलेली आहे. ती वडिलांना 'सोडून आली' आहे. पण तिच्या वडिलांचा स्वभाव कसा आहे याविषयी आपल्याला काही कळत नाही. तिचे वडील आणि सोलनेस यांचा स्नेह बऱ्यापैकी असावा एवढा अंदाज आपण करू शकतो. हिल्डा आधुनिक व्यक्ती आहे पण तिच्या व्यक्ति-

मत्त्वाची मुळं जुन्या नॉर्वेजियन पारंपरिक मिथ्यकथांत असावीत असे दिसते. हिल्डाबरोबर असताना सोलनेसला वायकिंग्ज काळातील काही घटना आठवतात ही घटना बोलकी आहे.

हिल्डा सोलनेसवर जे प्रेम करते त्यात स्वप्नाळू व रोमँटिक मनोवृत्तीचा भाग भरपूर आहे. पण विचित्र म्हणजे घटना अशा घडतात की या मनोवृत्तीचा तडाखा हिल्डाला बसण्याऐवजी परिपक्व व यशस्वी सोलनेसलाच बसतो. इब्सेनच्या आयुष्यात आलेली एमिली बार्डाख हे हिल्डाचे मॉडेल होते. आणि तिच्याशीच हा भाग निगडित असावा असे मानले जाते. हिल्डाची व्यक्तिरेखा एका पातळीवर पूर्ण वास्तववादी तर दुसऱ्या पातळीवर सुपरनॅचरल– अद्भुत अशी आहे. तिचे द्विस्तरीय व्यक्तिमत्त्व इब्सेनने वारंवार स्पष्ट केले आहे. वास्तविक हिल्डा निरागस, हसरी, खेळकर आहे पण ट्रोल-सदृश सामर्थ्य असणारी हिल्डा विनाशक आहे. तिच्या वडिलांचे घर तिला पिंजऱ्याप्रमाणे होते व ती आता उडून सोलनेसकडे आली आहे पण घार ज्याप्रमाणे भक्ष्य पंजात धरते तसे तिला सोलनेसला पंजात धरायचे आहे.

हिल्डा डोंगराळ भागातून आली आहे आणि सोलनेस शहरातील आहे यावरून मराठी वाचकाची अशी समजूत होण्याची शक्यता आहे की हिल्डा सोलनेसपेक्षा खालच्या सामाजिक स्तरातील आहे. पण तसे नाही. सामाजिक-सांस्कृतिक दृष्ट्या हिल्डा सोलनेसपेक्षा वरच्या थरातील आहे. सोलनेस प्यूरिटन म्हणजे कर्मठ व शुचिर्भूत कुटुंबातून आलेला असला तरी तो खालच्या थरातील आहे व अधिकृत शिक्षण नसल्याने न्यूनगंड बाळगणारा आहे. त्याची पत्नी ॲलीन ही खानदानी कुटुंबातील आहे आणि तिने खालच्या स्तरातील परंतु कर्तबगार तरुणाशी लग्न केले आहे.

इच्छाशक्ती–विल पॉवर–हे नाटकातील एक प्रमुख विचारसूत्र आहे. आणि येथेच गोम आहे. इब्सेनचे मानवी स्वभावाचे मार्मिक ज्ञानही येथे कळून येते. सोलनेसची इच्छाशक्ती उत्तम आहे पण अत्युच्च स्थानावर पोहोचल्याने ती एकाएकी नष्टच झाली आहे. आणि नेमका तो या वेळी हिल्डाच्या प्रभावाच्या तडाख्यात सापडतो. १९ सप्टेंबर या तारखेभोवती गुंफलेले गूढ त्याला वैचारिक दृष्ट्या कमकुवत बनविते. आणि स्वातंत्र्याची जबरदस्त जोम असलेली हिल्डा त्याला तिच्या प्रबळ इच्छाशक्तीच्या पंजात पकडते. राग्नर या त्याच्या हाताखालच्या तरुण आर्किटेक्टला हवे असलेले अनुकूल सर्टिफिकिट जेव्हा हिल्डा त्याला लिहायला लावते तेव्हाच तो खरा पराभूत होतो. उरलेल्या वयस्क सोलनेसला हिल्डाचे तारुण्य खलास करते. सोलनेस साठीच्या आसपास आणि हिल्डा तेवीस-चोवीस वर्षांची आहे हे लक्षात घेतले पाहिजे.

उतारवयात विशेषत: पुरुषांना, कोवळ्या परंतु शारीरिक दृष्ट्या ठसठशीत तरुणींबद्दल विलक्षण आकर्षण वाटू शकते. अशी माणसे सर्जनशील असतील, कलावंत पिंडाची असतील तर हे आकर्षण स्पष्टपणे उमटत राहते. कारण सर्जनशीलतेच्या आविष्काराला जोम, उत्साह यांची आवश्यकता असते आणि तो अशा तरुणींच्या संबंधातून मिळेल असे त्याला वाटत राहते. तर तरुण मुलींनाही काही वेळा वयस्क पण श्रीमंत व प्रसिद्ध माणसांबद्दल आकर्षण निर्माण होऊ शकते. हाही भाग हिल्डा-सोलनेस यांच्या संबंधात महत्त्वाचा आहे. हिल्डाचे प्रेम निश्चित झाल्यावरच सोलनेस काया फोस्ली या त्याच्या स्टेनोला रजा देतो हे लक्षात घेण्याजोगे आहे. पण बिचाऱ्याला कळत नाही की त्या क्षणी तो त्याचा मृत्यूही निश्चित करतो आहे. काया फोस्लीदेखील त्याच्यावर आषक झाली आहे पण तिच्या प्रेमात व्यावहारिकतेचा भाग आहे. "उंचीवरील" सोलनेस आणि त्याचा मृत्यू घडवून आणणारी हिल्डा यांची चाहूल इब्सेनच्या सुरुवातीच्या नाटकात ब्रान्द–गेर्द यांच्या संबंधातच अस्फुटरूपाने लागते. 'तू माझ्या चर्चमध्ये अखेरीस आलास तर' असे गेर्द म्हणते तसेच 'अखेरीस तुम्हाला टॉवरवर चढलेले मला पाहायचे आहे' असे हिल्डा म्हणते. दोघीही पर्वतातील तारुण्याच्या उंबरठ्यावरील मुलीच आहेत. उंचच उंच गोष्टींविषयी दोघींना स्वाभाविक ओढ आहे.

प्रियकराला वा प्रियतम पुरुषाला मृत्यूप्रत नेणाऱ्या वा जाऊ देणाऱ्या स्त्री-रेखा इब्सेनमधील अत्यंत महत्त्वाच्या व्यक्तिरेखा होत. स्त्रीमुक्तीत यांचीच आवृत्ती वेगळ्या तऱ्हेने निघते. तेथे पुरुष मृत्यू पावत नाही पण पुरुषी वर्चस्व मारले जाते. निघून जाणाऱ्या नोरासमोर खुर्चीत कोसळून बसणारा हेल्मर किती चैतन्यशून्य बनतो हे पाहण्यासारखे आहे. स्वत:च्या नवऱ्याला तो जिवंत असताना खलास करता येत नाही पण आल्विंगबाईंच्या इच्छेची परिपूर्ती त्या नवऱ्यासाठी

बांधलेले स्मारक-गृह आगीत भस्मसात होते तेव्हा किती नकळत पण स्पष्टपणे होते. परंतु इब्सेनचे हे वैशिष्टच किंवा मोठेपण म्हटले पाहिजे की या व्यक्तिरेखांमधील ट्रोलसदृश भाग सुचवूनही इब्सेन त्यांना दुष्ट, दुरित (ईव्हिल) अशी शक्ती मानताना दिसत नाही. मिथ्य-कथात्मक आणि मानसशास्त्रीय पातळचांवर तो भर देताना दिसतो. केवळ दुष्टात्मा स्त्रिया म्हणून ढोबळपणे या व्यक्तिरेखांना एकत्र गुंफण्यात अर्थ नाही पण त्याच वेळी त्या एकाच सूत्रात कशा गुंफल्या गेल्या आहेत आणि पन्नास वर्षांच्या प्रदीर्घ लेखन-प्रवासातही हे सूत्र म्हणजे प्रिय-पुरुष व्यक्तीला मारण्याचे सूत्र कसे शाबूत राहताना दिसते हे पाहण्यासारखे आहे. या सूत्राचा व्यत्यास म्हणून काही नाटकांत स्त्रिया नायकांबरोबर मृत्यूला सामोऱ्या जाताना दिसतात. उदा., डेड अवेकन-मधील इरीना वा ब्रान्दमधील अॅग्निस. पण येथेही त्या त्यांच्या अगदी इच्छेविरुद्ध वागतात असे नाही. त्यांचे मरण म्हणजे काही राजपूत स्त्रियांचा जोहार नव्हे.

आश्चर्य वाटते ते ह्याचे की प्रिय व्यक्तींना मृत्यूप्रत नेण्यात या इब्सेनी स्त्रिया बहुतेक वेळा यशस्वी होतात याचे. पण या साऱ्याच स्वतःची शोकान्तिका ओढवून घेणाऱ्या, प्रामुख्याने आत्महत्यारी ( सूईसायडल ) स्त्रिया आहेत हे लक्षात ठेवले पाहिजे. प्रिय-पुरुषाला मारणे, मरू देणे, मरणाला उद्युक्त करणे हा त्यांच्या एकंदर अस्तित्व-समाप्तीचाच भाग आहे, एक पायरी आहे. या व्यक्तिरेखांच्या बाबतींत मुक्ती आणि मृत्यू असा फरक, फक्त सामाजिक संदर्भ फार महत्त्वाच्या असणाऱ्या नाटकातच होतो. एरवी मृत्यू आणि मुक्ती एकरूप पावताना दिसतात. या दोहोंत आध्यात्मिक फरक उरत नाही.

इब्सेनचे हे स्त्रीचे आकलन काव्यमय आणि गूढवादाला जवळ जाणारे असले तरी ते जिवंत तपशील भरघोसपणे व कौशल्याने रंगविणाऱ्या वास्तववादी पद्धतीने व्यक्त झाल्याने वास्तववादी मानले जाते. अगदी काटेकोरपणे पाहिल्यास ते तसे नाही असेच म्हणावे लागते. मूळ आकलन मार्मिक असले तरी रोमॅण्टिक आहे. सामाजिक आशय येतो तेव्हा त्याला धारही प्राप्त होते पण त्याचा रोमँटिक गाभा शाबूत राहतोच. मग असे हे आकलन स्त्रियांना का आवडले असावे ? वर्षानुवर्षे अन्याय, अपमान सोशीत स्त्रियांना पुरुषी वर्चस्वाखाली राहावे लागले आहे. त्यांच्या आशा-आकांक्षा, ध्येये, आवडी-निवडी यांना दडपून टाकत राहावे लागले आहे. प्रेम व त्यागाच्या गोंडस नावाखाली त्या भरडल्या, चिरडल्या गेल्या आहेत. त्यामुळे पुरुषांवर सूड उगविण्याची, पुरुषांना दुखविण्याची, दुखापतही करण्याची सुप्त इच्छा अनेक स्त्रियांनी मनात खोलवर वागविलेली आहे. ही इच्छा इब्सेनने नेमकी हेरून तिचा आविष्कार करणाऱ्या मूर्ती, नायिका निर्माण केलेल्या आहेत आणि एवढ्यापुरत्या त्या मार्मिक, अस्सल राहतात. रोमँटिक, गूढ आणि मिथ्यकथात्मक भाग राहतो तो त्यांच्या स्वतःच्या आत्मसमर्पणाचा, आत्महत्यांचा आणि तो शोकात्म म्हणूनच आपल्याला पाहावा लागतो. अगतिक स्त्रिया बऱ्याचदा स्वतःला पेटवून घेतात किंवा पाण्यात जलसमाधी घेतात हे गृहीत धरूनसुद्धा.

याचा अर्थ असा नाही की इब्सेनी नाटचसृष्टीत स्वतःला आवडलेल्या, प्रिय-पुरुषाशी लग्न करून सुखी संसारीजीवन स्वीकारणाऱ्या, सर्वसाधारण वळणाच्या स्त्रिया नाहीत. तशा आहेतच. बोर्गहाईमशी लग्न करणारी अॅस्टा, किंवा उतारवयातील वेर्लेसाहेबांशी लग्न करणाऱ्या स्योर्बिबाई, आलमर्सशी लग्न केलेली रीटा, अशा बऱ्याच व्यक्तिरेखा आहेत. त्यांचे चित्रण गुंतागुंतीचे व आकर्षकही आहे. परंतु इब्सेनच्या ह्या खास गाजलेल्या स्त्री-व्यक्तिरेखा नव्हेत. इब्सेनच्या खास स्त्री-व्यक्तिरेखा 'शोकात्म नायिका' किंवा तशा स्वरूपाच्या व्यक्तिवादी नायिका ह्याच होत. आणि स्मरण होते, चर्चा केली जाते ती नेहमी या स्त्री-व्यक्तिरेखांची. रंगभूमीवर अतिशय देखण्या नटचांनी भूमिका केली असेल तर गोष्ट वेगळी पण एरवी वाचकांना तर इब्सेनच्या सिग्ने, डॅफ्नी, बीटा रोझमर्स, अॅलिन सोलनेस यांसारख्या स्त्री-व्यक्तिरेखा लक्षातही राहात असतील की नाही शंकाच आहे. त्या अविभाज्य घटक म्हणून नाटकात येतात पण त्यांचा ठळक संस्कार होत नाही.

पुरुषाला मुक्ती देणारी वरदायिनी स्त्री या मिथिकल–स्वरूपातही इब्सेनने स्त्रीला जरूर पाहिले. आणि या व्यक्तिरेखा त्याच्या सर्वसाधारण स्त्रियांच्या व्यक्तिरेखांपेक्षा निश्चितच कितीतरी चांगल्या वाटतात. आल्फहील्ड, झोलवेय्ग, एला रेन्थाईम, ईरीन अशांसारख्या या व्यक्तिरेखा होत. या नाटचमय असण्यापेक्षा काव्यमय वाटतात. आणि त्यांचे सामर्थ्यही त्यांच्या

काव्यात्मकतेतच आहे. ईरीन ही त्याची अखेरची स्त्री-नायिका म्हणजे तर एक सुंदर आणि गडद कविताच होय. तिच्या स्मृती नाट्यमय आहेत, प्रत्यक्ष कृती नाहीत. ती जे काय सांगते त्यावर पूर्ण विश्वास ठेवायचे झाले तर आर्नल्ड रूबेक, खुनी वेश्येतही त्याचा सुंदर आदर्श पाहतो आणि तिच्याबरोबर मृत्यू हेच त्याला पुनरुज्जीवन वाटते. ख्रिश्चन विचारसरणीचा संस्कार 'नकळत' पण किती ठळक असू शकतो याचेही हे उदाहरण होय.

हुंड्याच्या निमित्तावरून सासरी होणारा छळ, सासूचा, नणदांचा जाच, नवऱ्याचे बाहेरख्याली वर्तन वा मद्याच्या आहारी जाणे, वारंवार होणारी मुले, शिक्षणाचा अभाव, घरातच जखडून पडणे ह्यांतून सर्वसाधारण स्त्रीची दुःखगाथा घडत असते. आणि ही दुःखगाथादेखील अत्यंत महत्त्वाची असते परंतु साहित्यिक म्हणून इब्सेन अ-साधारण स्त्रियांचे चित्रण करतो आणि त्यांच्या शोकात्मिका रंगवितो. सर्व-साधारण स्त्रियांचे जखमी आणि व्यथित जीवन आलेच तर पार्श्वभूमी म्हणून येते. जिच्यासाठी ब्रान्द वादळात होडी घालतो ती स्त्री रंगभूमीवर दिसतही नाही. जी बीटा निपुत्रिक होती आणि मनाने व शरीराने खचली होती ती भूतकाळाचा भाग म्हणून येते. इब्सेन ज्या प्रकारची शोकान्तिका निर्माण करीत होता त्याची ही मर्यादाच आहे. पण अशा प्रकारच्या सर्वसाधारण स्त्रीच्या व्यथांचे त्याला भानच नव्हते असे नाही. एरवी 'वाट चुकलेल्या स्त्रियांसाठी' कपडे विणण्याचा भाग त्याने आवर्जून पिलर्समध्ये आणला नसता किंवा पतीच्या हेकट ध्येयवादापायी स्वतःचे लहान मूल गमाविण्याचा ॲग्निसच्या जीवनातील भागही त्याने रंगविताना एक गरीब स्त्री स्वतःच्या मुलांच्या कपडयांसाठी अक्षरशः भीक मागताना त्याने दाखाविली नसती. किंवा फोल्डालच्या गुणी मुलीच्या शिक्षणाची व्यवस्था होण्याचा भाग त्याने बोर्कमानमध्ये आणला नसता. त्याला या व्यथांचे भान जरूर होते पण त्यांना त्याने लक्ष्य बनविलेले नाही. त्या रेखाचित्रे राहावीत तशा राहतात आणि गौणार्थाने महत्त्वाच्या ठरतात. प्रभावी व्यक्तिमत्त्वांच्या स्त्रिया आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील गुंतागुंत व त्यांच्या वाटयाला येणाऱ्या शोकान्तिका इब्सेनच्या सर्जनशीलतेला जास्त आव्हान देणाऱ्या वाटतात हे मान्य केले पाहिजे.

पण इब्सेनच्या गडद आणि दुःखमय नाट्यविश्वात स्त्रीला सुख, समाधान आणि प्रगतीची आशा आहे. दस्तयेवस्कीइतके गडद आणि दारुण विश्व हे नाही. लोना हेसेल किंवा नोरा यांच्यासारख्या ठळक स्त्रीरेखा या आशेची प्रतीके आहेत असे नाही तर रोजिना, पेत्रा स्टोकमान्, फ्रीडा फोल्डाल, एलिदा वांगेलच्या दोन मुली– बोलेटा आणि हिल्डा, यांच्यासारख्या नव-यौवनाच्या उंबरठयावर उभ्या असणाऱ्या मुली या आशा-प्रकाशाची प्रतीके आहेत. स्त्रियांच्या दृष्टीने ऐतिहासिक वर्तमानकाळ दारुण आणि गडद असला तरी भविष्यकाळ उज्ज्वल आणि आनंददायी आहे याची ग्वाही या तरुण मुली देतात. आणि ही घटना इब्सेनच्या वाचक प्रेक्षकांना मग तो कोणत्याही वयाचा व देशाचा असो दिलासा देणारी वाटते. स्त्रियांना इब्सेन आवडतो याचे एक कारण या इब्सेनच्या तरुण मुली हे आहे. इब्सेनी स्त्रियांची जी शोकान्तिका रंगवितो ती स्त्रीमुक्ती आणि स्त्रियांची प्रगती झाली तरी अबाधितच राहणार आहे कारण तिचे स्वरूप दुर्मिळ व जास्त मूलभूत आहे. परंतु अशी मूलभूत शोकान्तिका टळत नाही म्हणून मुक्त आधुनिक स्त्रीच निर्माण व्हावयास नको किंवा होणे शक्य नाही असा विकृत, उपहासवादी दृष्टिकोण इब्सेनमध्ये आढळत नाही. किंवा एकंदर स्त्रीविषयकच तुच्छता वा उदासीनता कोठे मूळ धरू लागली आहे असे दिसत नाही.

'बोर्कमान' या इब्सेनच्या गडदतम नाटकात फ्रीडा फोल्डमान या कोवळया तरुणीची व्यक्तिरेखा त्याने आल्हाददायक आशावादी रंगात रंगविलेली आहे. फोल्डाल हा बोर्कमानचा जवळचा मित्र. साधा दुय्यम दर्जाचा लिपिक आहे आणि बोर्कमानबरोबरच तोही आपत्तीत सापडला आहे. पण त्याच्या जुन्या मित्राला तो चिकटून आहे.

फ्रीडा त्याची मुलगी. तिला पियानो छान वाजविता येतो. पण भवितव्य ? तिला चांगले शिक्षण देणे फोल्डालच्या आवाक्याबाहेरचे आहे. पण ज्यांच्या प्रेमात बोर्कमानचा मुलगा एरिक पडला आहे त्या विल्टनबाई फ्रीडाला बरोबर घेऊन जातात आणि तिला पियानो वादनाचे उच्च शिक्षण देण्याचे ठरवितात. फोल्डाल पतिपत्नी आनंदून जातात. बोर्कमान-गूनहील्ड यांच्यापासून एरिक दूर जाणे हा त्यांच्या दृष्टीने दुःखद प्रसंग पण फोल्डालला तो आनंदाचा वाटतो कारण पियानो

वाजविण्यात नैपुण्य मिळविलेल्या एरिकबरोबर फ्रीडा नॉर्वे सोडून जाणार यात तिला एरिक जीवनसाथी म्हणून मिळण्याची शक्यताही दडलेली आहे. अर्थात एरिक– विधवा विल्टनबाई आणि फ्रीडा हा भावी त्रिकोण आहे.

ज्या बग्गीतून फ्रीडा–श्रीमती विल्टनबाई–एरिक हे त्रिकूट जाते त्याच बग्गीची धडक बसून फोल्डाल पडतो व त्याला दुखापत होते. पण याचेही फोल्डालला समाधानच होते कारण त्या भारी बग्गीच्या पुढे जाण्यातच त्याच्या एकुलत्या एका मुलीचे भवितव्य आहे. आपली काव्य करण्याची शक्ती स्वतःच्या मुलीतील पियानोवादनात अवतरली आहे आणि ती मुलगी पुढे यशस्वी व सुखी होणार यानेच तो आनंदून गेला आहे. या आनंदापुढे त्याला अपघाताची पर्वा नाही.

ही घटना बोलकी आहे. गूनहील्ड, एला आणि बोर्कमान यांची शोकान्तिका. तर फ्रीडा, एरिक यांना आशेचा उषःकाल. स्त्रीची शोकान्तिका रंगविणारा थोर साहित्यिक इब्सेन तिच्या स्वातंत्र्याची व प्रगतीची स्वप्ने पाहणारा सच्चा मित्रही होता हेच खरे !

**संदर्भ :**


१. Myer M.; *Ibsen* a biography; Penguin (1971); पृ. 610.

२. *Downs Brian* : A Study of Six Plays by Ibsen; Cambridge U. P. (1950).

३. Freud Sigmund : *Some Character Types* ment with in Psycholanalytic work (1916).













# प्लास्टिक आर्ट्स, कलाजाणीव व महाराष्ट्रीय उदासीनता

नरेन्द्र डेंगळे

लहान होतो तेव्हा वाटायचे की कलावृक्षाच्या कोठल्याही एका शाखेवर कळचा आल्या म्हणजे इतरही शाखांवर (बांडगुळे धरून!) थोडचाच दिवसांत कळ्या यायला हव्या. पण इतर शाखा आपल्या सदैव कोरडचाच. शास्त्रीय संगीतात समृद्ध असलेल्या महाराष्ट्रात नाटच, नृत्य यांचाही तेवढाच विकास का होत नाही असा प्रश्न पडे, मग चित्रकला, शिल्पकला आणि वास्तुशिल्पकला ह्या दृक्कलांची त्रयी उगवण्यासाठी येथे लायक भूमी, पाणी व वातावरणच नव्हते यात नवल ते काय ?

मुंबई हा एक प्रचंड अपवाद आहे. महाराष्ट्राच्याच दृष्टीने नव्हे तर सर्व देशाच्याच दृष्टीने ते एक लोकविलक्षण महानगर आहे. चार्ल्स कोरियांनी मुंबईचे वर्णन करताना म्हटले आहे की, 'मुंबई शहराचे रोपटे दिवसेंदिवस कोमेजत चालले आहे; परंतु तेथील नागरीपण अधिकाधिक समृद्ध होते आहे.' थोडक्यात, त्या महानगराची पाणीपुरवठचाची योजना, सांडपाणी-गटारांची योजना, कचरा गोळा करून विल्हेवाट लावायची यंत्रणा, तेथील दूषित वातावरणाला स्वच्छ, निरोगी करण्याची उपाययोजना, तेथील नागरी दळणवळण यंत्रणा, कामासाठी दररोज नव्याने येणाऱ्या मानवी पुराची सोय, वीज, टेलिफोन इत्यादींचा विचार करताना दिसते की हे महानगर थकून गेले आहे. ह्या महानगराची तब्येत सुधारणारा वैद्य कोठे दिसत नाही, ना आढळतात योग्य औषधे. हे सर्व खरे असले तरीही येथील मानव मोठा धडपडचा दिसतो. त्याचा उत्साह, आशावाद हा आश्चर्यकारक आहे. तो येथील नागरी वातावरणात जणू पोहत असतो. 'नको' म्हटले तरी मुंबईत एकलकोंडचा मानवाचा दुसऱ्या समप्रवृत्तीच्या मानवाशी संबंध येतोच व नव्या अर्थाने, खऱ्या अर्थाने लोकसमूहाची निर्मिती होत असते. मार्गारेट मीडने तिच्या लहानपणच्या आठवणीतले एक सुभाषित सांगितले होते ते असे, "देव नाती निर्मितो तर मानव मैत्री." लहान खेडचात जातिजमाती, नात्यानुसार वस्ती करीत असलेला मानव, महानगरात त्यापासून थोडासा दूरच जाऊन स्वतःच्या आवडीचे, मैत्रीनुसार, विचाराला प्रतिसाद मिळणारे वलय निर्माण करू लागतो. महानगरात सांस्कृतिक विचारांची देवाणघेवाण सुरू होते अशी. प्रत्येक उपनगरात एक छोटा फिल्म-क्लब, एक म्युझिक सर्कल, आणि गणेशोत्सवाने सुरुवात झालेले नाटचाकर्षण ही अधूनमधून घासून पुसलेली सांस्कृतिक-कलेची अंगे आमच्या सामान्य नागरिकांच्या जाणिवेचा भाग झालेली आहेत. नवी आव्हाने करताना, नवा विचार मांडताना ह्याच महानगरापुढे जावे लागते. तेथेच नागरी जाणिवेशी आपल्या विचारांची शक्ती अजमावावी लागते. म्हणूनच महाराष्ट्राची कलाजाणीव व मुंबईसारख्या महानगराची कलाजाणीव यांचा परस्परसंबंध थोडचा त्रयस्थपणेच न्याहाळणे जरुरी आहे.

देशातील पहिले कलामहाविद्यालय मुंबईत स्थापले गेले. येथेच आधुनिक चित्रकला, शिल्पकला व वास्तुशिल्पकला यांच्या विश्वाचे दालन उघडले गेले. राजकीय, सामाजिक कारणांसाठी आम्ही मुंबईवर हक्क कितीही सांगितला तरी मुंबईकरांच्या कलाजाणिवांचे पैलू केवळ महाराष्ट्रीय असते तर आपोआपच त्यांची प्रभा महाराष्ट्रातील इतर शहरांवर पडल्याशिवाय राहिली नसती. साहित्यात कदाचित एक सार्वत्रिक जाणीव निर्माण झाली याचे कारण शब्दभाषेशी महाराष्ट्रीय समाज परिचित होता. ज्या नागरी अनुभवांतून लिखाण झाले त्याचे सर्वसामान्य संदर्भ बहुजन समाजाला ठाऊक होते. पण तरीही अधिक व्यापक व आधुनिक नागरी जाणिवेतून जे लेखन झाले ते काव्य, कथा व नाटच, तसेच राजकीय वैचारिक लेखन यांचे संदर्भ सर्वपरिचित होते असे नव्हे. मुंबईत स्थापन झालेल्या कलामहाविद्यालयाचे पडसाद देशात इतरत्र उमटले. तेथे शिकून उत्तीर्ण झालेले कलाकार

वास्तुशिल्पी उठून दिल्लीला गेले, कलकत्त्याला गेले, परदेशी गेले. काही मुंबईतच राहिले. पहिले-वहिले कला-पदवीधर म्हणून त्यांनी सरकारी नोकऱ्यांची सर्वोच्च स्थळे गाठली. C P W D चे कित्येक प्रमुख वास्तुशिल्पी सर जे. जे. स्कूलचेच पदवीधर होते. एवढेच नव्हे तर मराठीही होते. त्यांच्या जाणिवा मुंबईतच रुजल्या, फुलल्या होत्या. म्हणूनच की काय मुंबईमध्ये फुललेली ही कलाजाणीव आंतरराष्ट्रीय स्वरूपाची राहिली. उद्योगीकरणाचा गंध फक्त मुंबईतच तिला मिळू शकला. तिने मुंबईतच नाही तर इतर महानगरांत राहणे पसंत केले, व ती महाराष्ट्रीय जाणिवेपेक्षा अलिप्तच राहिली. महाराष्ट्रीय जाणिवेचे संगोपन पुणे, नाशिक, वाई, रत्नागिरी, कोल्हापूर, सातारा येथे होत होते. त्या जाणिवेपासून मुंबईकरांची जाणीव, विशेषतः दृक्कलाक्षेत्रातली, अलिप्तच राहिली.

सर जे. जे. स्कूलच्या स्थापनेनंतर आजपर्यंत देशभर चित्रकला, शिल्पकला व विशेषतः वास्तुशिल्पकलांची महाविद्यालये यांचा प्रचंड 'रॅश' उठला आहे. त्यामुळे अर्थातच मुंबईच्या 'जे. जे.'चे महत्त्व देशव्यापी राहिलेले नाही. आणि दिल्ली, बडोदे, अहमदाबाद यांकडे प्लास्टिक आर्ट्स शिक्षणाचे अधिष्ठान गेलेले दिसते. शांतिनिकेतन हेही एक वेगळेच बेट होते.

ऐतिहासिक दृष्टयाही आपण महाराष्ट्राकडे पाहिले तर दृक्कला व विशेषतः प्लास्टिक आर्ट्सच्या क्षेत्रात, महाराष्ट्र "कणखर देशा, पवित्र देशा, रे दगडांच्या देशा"च राहिलेला दिसतो. ओबडधोबड देवळे, किल्ले, वाडे. यांमध्ये रचना, सौंदर्यशास्त्र यांचा अभावच दिसतो. आमचे राज्यकर्ते व श्रीमंत प्रतिनिधी सौंदर्यकल्पनांची आयात दिल्लीहूनच करताना आढळतात. ज्या सरदार, राजेरजवाड्यांचा संपर्क उत्तर हिंदुस्थानशी होता, त्यांनी तेथून मध्यभारतात, राजस्थानात व महाराष्ट्रात वास्तुशिल्पकलेच्या तत्कालीन नवसंकल्पनांची आयात केलेली दिसते. मध्यभारतात व राजस्थानात या कलासंकल्पनांवर स्थानिक संस्कार होऊन तेथील कला एक वेगळेच क्षितिज गाठताना दिसते. महाराष्ट्र स्वतःची अस्मिता टिकविताना दिल्लीच्या तख्ताखाली न आल्याने की काय, तेथे या दृक्कलांचा विकास झालेला आढळत नाही. मोगल राजवटीने भारतात चित्रकला, कलाकुसर, स्थापत्यशास्त्र, वास्तुशिल्पकला (शिल्पकला मात्र नाही. मोगलांनी उलट त्या वेळचे शिल्प उद्ध्वस्तच केलेले दिसते.) ह्या क्षेत्रांत मात्र खूपच परिवर्तन घडवून आणले. वास्तुशिल्पकलेमध्ये खऱ्या अर्थाने नवा रचनाशास्त्रविचार, संकल्पना आणि बांधकामाची शास्त्रोक्त पद्धत या सर्वांचीच भर भारताच्या वास्तुशिल्पकलेच्या आधीच समृद्ध असलेल्या साठ्यात पडली व त्यातूनच नवशैलींचा प्रभाव भारतभर पडला. 'नवे ते हवे जुने ते नको', हे खरेदी करायला गेलेल्याचे तत्त्व असते! त्यानुसार प्रथम मोगल व नंतर ब्रिटिश हे प्रामुख्याने भारतीय वास्तुशिल्पकलेवरील प्रभाव होत. गोवा, कोचीन, सौराष्ट्र, जैसलमेर, आसाम, मणिपूर इत्यादी देशाच्या सीमेवरील प्रांतांत स्पॅनिश, पोर्तुगीज, फ्रेंच, अरबी, ज्यू, डच, बर्मीज शैलींचा प्रभाव, त्यांचा सुंदर विकास व त्यांचा तेथील वातावरणाशी सहजसुंदर मेळ, झालेला आढळतो. परंतु हा प्रभाव भारतात इतरत्र पसरायला तसे दळणवळणही नव्हते किंवा राजवटही नव्हती, म्हणूनच तो तेथील क्षेत्रापुरताच मर्यादित राहिला. या काळात म्हणजे तेराव्या शतकाच्या अखेरीस खिलजी राजवटीमध्ये जेव्हा हिंदुस्थानात प्रथमच 'कमान' बांधली गेली तेव्हापासून ते अकबरापर्यंत म्हणजे १७ व्या शतकाच्या सुरुवातीपर्यंत उत्तरेत मोगलवास्तुशिल्पकला पारंपरिक हिंदुकलेशी संघर्ष करीत होती, मैत्री करीत होती व याच नात्यातून काही नवे निर्माण होत होते. फत्तेपूर-सिक्री हे या काळातील सर्वोच्च शिखर मानायला हवे. स्वतःच्या ४९ वर्षांच्या राजवटीत कलाक्षेत्रात विशेषतः प्लास्टिक आर्ट्समध्ये अकबर या वृक्षाखाली सर्वच कलांना बहर आलेला दिसतो. ताजमहाल हा अकबरानंतर बांधला गेला तो अकबराने पेरलेल्या बीजाचेच फळ होय. फत्तेपूर-सिक्रीममध्ये रचनातत्त्व, तत्त्वज्ञानाची वास्तुशिल्पकलेतील भूमिका ही स्पष्ट होतात तर ताजमहालमध्ये प्रमाणबद्धता, कलाकुसर व हस्तकलांचे वास्तुशिल्पकलेतील स्थान सर्वाधिक स्पष्ट व शुद्ध झालेले दिसते.

उत्तरेत वास्तुशिल्पकलेत अशा विविध घटना घडत होत्या तेव्हा इतरत्र काय घडत होते? दक्षिणेत मदुराईला मीनाक्षीचे मंदिर (इ स १६००), चौदाव्या शतकात वारांगल राजपुत्र हरिहर व बुक्क यांना दिल्लीला नेऊन इस्लामची दीक्षा दिलेली दिसते. पण परत हंपीला आल्यावर पुन्हा हिंदू बनून हरिहरने हंपी या स्वतःच्या राजधानीचा विस्तार केला. त्याने मोगलां-

कडून धर्माबरोबरच जणू वास्तुशिल्पकलेची दीक्षा घेतली. सोळाव्या शतकात कृष्णदेवरायने हेच राज्य अधिक समृद्ध केले. सतराव्या शतकात शिवाजी महाराजांनी स्वराज्याची स्थापना करीपर्यंत महाराष्ट्रात वास्तुशिल्पकलेत काहीच वैशिष्टयपूर्ण घटना घडलेल्या दिसत नाहीत. शिवरायांनी किल्ले बांधले व स्वतःचे लक्ष स्वराज्याचा पाया भक्कम करण्याकडे पुरविले. इतर काही राजेरजवाडे व सरदारांनी अतिशय माफक प्रमाणावर देवळे व स्वतःचे वाडे बांधले. त्यांमध्ये नवीन कलाविचार, कलाकुसर किंवा रचनातत्त्वाची बूज दिसत नाही.

पंधराव्या शतकात बहामनी राज्याचा अस्त, मराठ्यांचा उदय, अहमदनगरची निजामशाही, गुजरात, खानदेश, माळवा भागांत मोगल सुलतानी व दक्षिणेत विजयनगरचे हिंदुराज्य, पोर्तुगिजांचा शिरकाव ह्या घटना घडल्या.

छत्रपतींच्या आधीच्या दोन शतकांत धार्मिक, आध्यात्मिक व साहित्यिक क्षेत्रांत आजच्या महाराष्ट्रात पुनरुज्जीवन प्रक्रिया जोरात होती. शिवकालीन एका छत्राखाली आलेल्या दमण–पुणे–कारवार या त्रिकोणात संरक्षणात्मक वास्तुशिल्पकलेने जोर घेतला. केवळ संरक्षणात्मक वास्तूंची बांधणी, ही समृद्ध वास्तुशिल्पकलेची निशाणी क्वचित असते. (किल्ले, दुर्ग इत्यादी). अठराव्या शतकात मराठा राज्याने पुन्हा एकदा नव्याने पाय रोवले. पण लगेच १८१७–१९ मध्ये मराठी राज्यसत्ता संपुष्टात आली. युद्ध करून राज्याचा विस्तार, भरभराट करायला लागणारी दूरदृष्टी व इच्छा असलेले आपले राज्यकर्ते कलेकडे लक्ष देण्याएवढी उसंत मिळवू शकले नाहीत. महाराष्ट्रीय कला-उदासीनतेचे हे एक महत्त्वाचे कारण आहे. मराठी कलाजाणिवेची झेपही छोटी, अल्पसंतुष्ट व म्हणूनच पुरोगामी होण्याऐवजी ती नामशेष होण्याच्याच मार्गावर आली. मराठी भाषा ही दक्षिणेकडील देवनागरी लिपीची व आर्यन भाषेची सर्वांत शेवटची शाखा. परंतु ही शाखा उत्तरेकडील चित्रकला, शिल्पकला, वास्तुशिल्पकला, यांचे प्रवाह महाराष्ट्रापर्यंत पोहोचवताना दिसत नाही. एवढेच नव्हे तर अजंठातील चित्रकला व वेरुळातील शिल्पकला पुढे महाराष्ट्रात कोठेच वृद्धिंगत झालेली आढळत नाही. पारंपरिक कलांचा वारसा– आमचा अभिमान हा फक्त स्वधर्मापुरता आणि संकुचित व व्यर्थ तर नाही ना अशी शंका त्याचमुळे मनात आल्याखेरीज राहात नाही.

वास्तुशिल्पकलेत जसे प्रमाणबद्धता तसेच 'प्रमाण' महत्त्वाचे असते. वाडे, लहान लहान बंगल्या, लहान लहान देवळे, तीर्थस्थान, बागा यांत आजही आपल्याला तत्कालीन वास्तुशिल्पकला नमुने, हस्तकला व बांधकाम तंत्रातील वैशिष्टये आढळून येतात हे खरे; पण तरीही अशा वास्तू कोठल्या विशिष्ट रचनातत्त्वाचा, सौंदर्यतत्त्वाचा पाठपुरावा करताना ना आढळतात ना त्यांचे नमुने ठरतात. नाशिक, पंढरपूर, वाई येथील नद्यांच्या दुतर्फा केलेल्या मंदिरांच्या वास्तू, घाटपायऱ्या, कुंडे, मोकळी प्रांगणे अजूनही आनंद देतात. वास्तुशिल्पकलेतील शिस्त, अवकाशाची व्याख्या सांगायचा प्रयत्न करतात; तरीही श्रीरंगम येथील शहराचे रचनातत्त्व ( १४ वे शतक ), मोधरा गुजरात येथील सूर्यमंदिर ( ११ वे शतक ), अदलज, सौराष्ट्र येथील विहीर ( १५ वे शतक ), दाई हरीर अहमदाबाद येथील विहीर ( १५–१६ वे शतक) यांचे वास्तुशिल्प पाहिले तर तेथे ललितकला, हस्तकला, रचनेची परिपक्वता यांनी एक वेगळाच सौंदर्यकळस गाठलेला आढळतो. महाराष्ट्रात सर्वसामान्यपणे वास्तुशिल्पकलेबद्दलचे प्रेम आटलेले, चित्रकलेविषयी तर कोठलीच जवळीक नाही आणि बौद्ध व जैन धर्मांच्या महाराष्ट्रातील ऱ्हासाबरोबरच शिल्पकलेचे विसर्जन झालेले दिसते. पुढे महाराष्ट्रात सत्तेवर आलेला श्रीमंत शेतकरी–बागायतकरांचा वर्ग कलेला राजाश्रय देण्यास थिटा पडला. महाराष्ट्रात आज असे एकही शहर नाही की जेथे पोटतिडकीने, नव्या उभारीने आणि संपन्न सौंदर्यदृष्टीने आमच्या राज्यकर्त्यांनी काही योजना शिस्तबद्धतेने अमलात आणलेल्या आहेत.

उद्योगीकरणाची प्रक्रिया खरे म्हटले तर महाराष्ट्रातच मोठ्या प्रमाणावर सुरू झाली. परंतु तिचा परिणाम फक्त मुंबईपुरताच मर्यादित राहिला आणि महाराष्ट्राच्या इतर प्रमुख शहरांना त्याचा सांस्कृतिक कलात्मक लाभ अभावानेच झालेला दिसतो. निष्काळजीपणाचे व उदासीनतेचे खापर केवळ राज्यकर्त्यांच्या माथी मारूनही प्रश्न सुटत नाही. राज्यकर्त्यांची ललितकलेबद्दलची अनास्था, दृक्कलेविषयीचे पूर्ण अज्ञान तर होतेच पण इतरही कोणी नवा विचार मांडलेला दिसत नाही. पारंपरिक ढोबळ तत्त्वांना व वास्तुशिल्पा-

वरील जुन्या श्लोकांना, ग्रंथांना आम्ही पुन:पुन्हा तपासून न पाहता, धार्मिक आंधळेपणाने चिकटून राहणेच पसंत केलेले दिसते. नाहीतर बौद्धलेण्यांनंतर म्हणजेच सातव्या–आठव्या शतकानंतरच्या खाणाखुणा सर्वत्र दिसल्या नसत्या का ?

फ्लॉरेन्स हे इटलीतील वैशिष्टयपूर्ण शहर. त्याच्या सौंदर्यवैशिष्टयांची घडण १२ ते १६ व्या शतकांत झाली. येथे कलासांस्कृतिक क्षेत्रात प्रबोधन सुरू होते ते १५व्या शतकात आणि ग्रीक व रोमन परंपरेचा वारसा विचारपूर्वक पुढे चालविला. फ्लॉरेन्सचे उदाहरण एवढयासाठीच घेतले की, 'या शहरात राहील, वाढेल त्याला ललितकलेचे, दृक्‌कलेचे एक असे वरदान असेल, त्याला मुद्दाम कोठे जाऊन औपचारिक कलाशिक्षण–संस्कार 'घ्यावे' लागणार नाहीत', या विधानाची प्रचीती तेथे एक आठवडाभर राहिले तरी चटकन येते व वास्तुशिल्पकळा ही तत्कालीन सांस्कृतिक पातळीचे सर्वाधिक मूर्त व शुद्ध प्रतीक का ठरते हेही ध्यानात येते.

लॉरी बेकर ह्या क्वेकर-वास्तुशिल्पीने केरळमध्ये व्यवसाय सुरू करताना जाहिरात केली, "अर्ध्या किमतीत अधिक सुंदर वास्तू." तरीही सामान्य नागरिकांकडून त्याला प्रतिसाद मिळालाच नाही. सर्वसामान्य, तसेच महत्त्वाचे निर्णय घेणारे सरकारी अधिकारी, कोणालाच नव्या, अभिनव व आधुनिक कलेला पाहण्याची तसेच कलादृष्टीतून भविष्यकालीन संस्कृती बघण्याची निकड वाटत नाही. सौंदर्यदृष्टी असावयास श्रीमंतीची गरज नसते. ज्या कोणाला स्वस्तात वास्तूची उभारणी करायची असते ते वास्तुशिल्पीपासून दूरच राहिलेले दिसतात. सर्वसाधारण समजूत अशी असते की वास्तुशिल्पी स्वतः महाग असतात आणि ते विनाकारण पैशाचा अपव्यय करून स्वतःच्या विचित्र कल्पना उभ्या करताना उपयुक्ततेचा बळी देऊन वास्तुनिर्मिती करतात. यात थोडेफार तथ्यही असेल. पण लॉरी बेकरसारख्यांच्या वास्तू बघितल्यावर या शंकेचे निरसन व्हायला हवे. त्याने बांधकामात अनेक प्रयोग केले. त्याने इमारतींना सुंदर पोत आणण्यासाठी नैसर्गिक बांधकाम-साहित्य अधिक कल्पकतेने वापरले. सूर्यप्रकाशाचा खेळ दाखविताना वास्तूत प्रसन्नता निर्माण केली. याउलट, उपयुक्ततावादाचा कीस काढून सपक व नीरस शहरे बांधणे म्हणजे कोठलीच काटकसर नाही हे महाराष्ट्रातील कुठल्याही शहराच्या वाढीकडे नजर टाकली तर समजावे. बेकरच्या नव्या प्रयोगामुळे गावातल्या हस्तकलांना उभार, पारंपरिक छपरे बांधणाऱ्यांना नवी दिशा मिळाली. त्यांच्या धंद्याला वेग आला. मोठ्या कारखान्यांतून उत्पादन केलेले लोखंड व सिमेंट ह्यांवरच पूर्णपणे अवलंबून न राहता स्थानिक कला-उद्योगांना त्याने तगवायचा प्रयत्न केला. अशा स्वस्त बांधकाम-प्रयोगाचा उपयोग जनतेने करून घेतला नाही. तशी जाणीवच कधी तयार झाली नाही. महाराष्ट्रात तर नाहीच नाही.

'कलेची फलश्रुती' या लेखात मर्ढेकरांनी वास्तुशिल्पकलेवर जाता जाता जे भाष्य केले आहे ते असे, "functionalism किंवा औचित्यवाद वास्तुकलेसारख्या थोड्या ललितकलांना आणि कलाकुसरीच्या वस्तूंना, हस्तकलांना किंवा crafts ना लावताना फारशी अडचण कदाचित भासणार नाही. **राहायला सोईस्कर असे घर ते सुंदर घर**: पायाला सुखाने बसेल अशी चर्मकृती किंवा चप्पल ती सुंदर चप्पल; एवढ्यापुरते ठीक आहे. इतकेच नव्हे, तर ख्रिस्ती चर्चची इमारत, मशिदीची इमारत आणि देवळाची इमारत या तीनही इमारतींचा उपयोग एकच असला तरी ख्रिस्त्यांची प्रार्थना, मुसलमानांची प्रार्थना आणि हिंदूंची प्रार्थना ह्यांत असा काही सूक्ष्म, तरल, गूढ भेद आहे की त्या त्यावर इमारतीचे औचित्य अवलंबून आहे, हेही एक वेळ मान्य. पण चित्रकला, शिल्पकला यांसारख्या ललितकलांचा विचार करायला लागले म्हणजे औचित्यवादाच्या ( functionalism च्या ) भूमिकेवरून आस्वाद घेणे वाटते तितके सोपे नाही..." यामध्ये वास्तुशिल्पकला ही पुरेशी ललितकला नव्हे. किंवा उपयुक्तता हीच अखेरीस त्याची सौंदर्य-कसोटी असते असे मर्ढेकरांना अभिप्रेत दिसते. नाही तर 'जे राहणे अधिक सुंदर करते, रोज अवकाशाचे नवे रूप दर्शविते, ते सुंदर घर' अशा प्रकारची व्याख्या त्यांनी मांडली असती. तसेच कोल्हापुरी चप्पल बनविण्याची हस्तकला व फत्तेपूरसिक्रीची वास्तुरचना यांना एकाच प्रकारच्या कला-प्रक्रिया समजणे म्हणजे ललितकला व हस्तकला (Art & Art-craft) या दोहोंमध्ये गल्लत करणे होईल. पारंपरिक हस्तकलांत पिढ्यान् पिढ्यांच्या अनुभवजन्यतेने सुधारणा होत असते. नवे घटक अलगद येत असतात. त्यांचा घाट बदलत असतो तोही अगदी सावकाश. दुर्दैवाने उद्योगीकरणामध्ये हस्तकलांना योग्य

संदर्भ न मिळाल्याने त्या नामशेष होत चालल्या आहेत. चित्रकला व शिल्पकला यांचा पारंपरिक पाया म्हणजे हस्तकला. त्या जर भडक, बाजारी झाल्या किंवा नामशेष झाल्या तर पुढील पिढ्यांचे कलासंदर्भ केवळ औद्योगिक कलांचेच राहतील. त्यांची मुळे मानवाच्या घडणीचा शोध घेत खोलवर जायला असमर्थ ठरतील. हस्तकलांना आधार देण्यासाठी योजलेले सरकारी कार्यक्रम हास्यास्पद आहेत. ते त्या कलाजाणिवेचा बोध न घेता आखलेले आहेत. सामान्य माणूसही हस्तकलांना विशेष आधार देत नाही. हँडलूमची कापडे एकवेळ सोडा. (तोही उद्योग आता धोक्यात आहे !)

महाराष्ट्रीय जीवनात शिल्पकला, चित्रकला व वास्तुशिल्पकला या प्लास्टिक आर्ट्सना काही स्थान आहे की नाही ? या कलांना पोषक अशी जमीन आम्ही नांगरणार आहोत की नाही ? त्याच्या मशागतीसाठी राबणार आहोत की नाही ? की पाण्याचा ओघ फक्त उसाकडेच नेणार ? सर्व मानवी बौद्धिक ऊर्जा केवळ उत्पादन आणि आर्थिक भरभराटीसाठीच वापरणार का ?

महाराष्ट्रात चित्रकलेचा आणि जनतेचा संबंध येतो तो कॅलेंडर्स, दिवाळी अंक–पुस्तकांची मुखपृष्ठे, मुलांची चित्रमय पुस्तके, नेत्यांची, साधुसंतांची चित्रे, पुराणांतील चित्रे यांतून. यात दीनानाथ दलाल, प्रभाकर गोरे, वसंत सरवटे, द. ग. गोडसे, पंडित, पद्मा सहस्रबुद्धे व सुभाष अवचट यांची कामगिरी वाखाणण्यासारखी आहे. त्यांची मुखपृष्ठे म्हणजे जणू एकेक स्वतंत्र रंगचित्र. ही चित्रे कल्पक, अभ्यासू व अनेक वर्षांच्या रियाझातून घडलेली आहेत. यांच्या जवळपास पन्नास वर्षांच्या काळात मराठी दिवाळी अंक व पुस्तक मुखपृष्ठे यांमधील व्यावसायिक चित्रकलेने काही वैशिष्टयपूर्ण वाटचाल केली. बाबूराव पेंटर आदींनी रंगविलेले नाट्यपडदेही विलक्षण वेधक व कल्पक असत आणि नाट्यसंगीताच्या यशात स्टेजक्राफ्टचाही काही भाग असणार हे आम्ही तितकेसे ध्यानात ठेवले नाही. परंतु मुख्य मुद्दा हा आहे की, पुस्तकांची मुखपृष्ठे (व इतर illustrative art) व नाटकाचे पडदे यांनी आमची कलाजाणीव अधिक समृद्ध केली का ? नवनाटकाला तसेच व्यावसायिक रंगभूमीला रंगविलेल्या पडद्याची आवश्यकता वाटत नाही म्हणून नाटकातील चित्रकलेचे स्थान पूर्ण संपून जावे का तिने नवे रूप घेऊन पुढे यावे (जसे मकबूल फिदा हुसेनच्या चित्रकलेने नवे रूप घेतले.), की चित्रकलेचे फक्त व्यावसायिक रूपच आम्हाला पाहणे पसंत आहे, आम्हाला परवडते ? 'केवळ चित्रकला' आम्ही केव्हा पाहायला शिकणार आहोत ? चित्रकला व शिल्पकला यांना आमच्या सांस्कृतिक नेतृत्वाने खऱ्या अर्थाने, जाणीवपूर्वक उत्तेजन दिलेले आढळत नाही. काहीसे उपेक्षित असे आमचे चित्रकार मग व्यावसायिक चित्रकलेकडेच वळत असले तर त्यात नवल काय ? महाराष्ट्रातील असंख्य कलाविद्यालयांत भरती होणारे विद्यार्थी स्वतःच्या कलासंकल्पनांना केवळ व्यावसायिक तडजोडीद्वारेच लोकांसमोर मांडू शकतात ही खेदाची गोष्ट आहे. पळशीकर, सडवेलकर, बेंद्रे, सामंत, लक्ष्मण पै, गायतोंडे, बर्वे, कोलते, पटवर्धन, प्रतिमा दलाल यांसारख्या आधुनिक चित्रकारांची कला यायला हवी त्या सोहळ्याने महाराष्ट्रासमोर आली नाही. तिचे स्वागत झाले ते मुंबईतच. त्यांना उत्तेजन मिळाले ते टाटा, भाभा, नॅशनल गॅलरी ऑफ मॉडर्न आर्ट आणि काही देशी-विदेशी रसिक यांजकडून. पण मराठी राज्यकर्ते, मराठी जनता, बौद्धिक वर्ग, व मराठी समृद्ध औद्योगिक व शेतकरी-बागायतदार वर्गांकडून कोठलेच प्रोत्साहन मिळालेले दिसत नाही, मग अ-मराठी व परदेशी चित्रकारांची दखल घेणे तर फारच दूरची गोष्ट. मकबूल फिदा हुसेनचे नाव ते काय सर्वश्रुत आहे, कारण त्याची चित्रकला सिनेमा-पोस्टर्सपासून, भारतीय कलाप्रदर्शने व विदेशी गॅलरीपर्यंत पोहोचली आहे परंतु रामकुमार पदमसी, अंबादास, सूझा रझा, आरा, खन्ना, रामचंद्रन, गुप्ता, वासुदेव, जतीन दास, तैय्यब मेहता, नलिनी मलानी, विवान सुंदरम्, लक्ष्मा गौड, जेराम पटेल आदींची वैशिष्टयपूर्ण कला व तिची ओळख तरी महाराष्ट्रीय जाणिवेला आहे का ?

शिल्पकलेत तर याहूनही दारुण अवस्था आहे. नाव घेण्याजोगा मराठी आधुनिक शिल्पकार तर जवळपास नाहीच. जे आहेत ते वास्तववादी मूर्तिकार. परंतु गुजराल डाबियरवाला, मीरा मुखर्जी, हिंमत शाह, नागजी पटेल, कुन्हीरामण, लतिक कात, वेदनायर, ध्रुव मिस्त्री इत्यादींची लाकूड, धातू, दगड आणि यांचे मिश्रण केलेली शिल्पे तर आमच्या जाणिवेचा भागच नव्हेत.

याचाच अर्थ असाही होतो की, मराठी साहित्यात पुरस्कृत झालेली मराठी संवेदना, मराठी सुबोधता

आणि जाणीव ह्यांत ललितकलेच्या ह्या अत्यंत महत्त्वाच्या (प्लास्टिक आर्ट्सचा) अंगांचा समावेशच नाही. आमच्यातील काही साहित्यिक वैयक्तिक दृष्टचा वर उल्लेखिलेल्या कलाकारांशी किंवा त्यांच्या कलेशी परिचित असतील, तरीही या कलाकारांची कला आणि आमचे साहित्य यांमध्ये काही आवश्यक वैचारिक दळण-वळण घडलेले दिसत नाही. त्यामधील वादविवाद, वैचारिक देवाण-घेवाण व ऊहापोहातूनच कला-जाणीव समृद्ध बनत असते आणि समाजात ती दृश्याकार घेऊ शकते.

वास्तुशिल्पकलेची उपेक्षा व तीबद्दलचा काहीसा आकस आश्चर्यजनक आहे. जगातील कला घडा-मोडींपासून आम्ही इतके अलिप्त राहिलो आहोत की, जी कल्पक वळणे घेणे भारतीय कलेला शक्य होते ती आम्ही दृष्टिआड केली आहेत. मोठ्या संस्था, विद्यालये, विद्यापीठे, खेडी, ग्रामपंचायती, यांनी वास्तुनिर्मितीसाठी स्वीकारलेले मार्ग पाहता रचनातत्त्वाचा व सौंदर्य-जाणिवेचा पूर्ण अभावच लक्षात येतो, आणि त्यातून स्पष्ट होतो तो जीवन जगण्याविषयीचा दृष्टिकोण.

मध्यप्रदेश, ओरिसा, राजस्थान, गुजरात तसेच आसाम, नागालॅण्ड, मणीपूरमधील गांवांतील खेड्यांतील घरे, राहणीपद्धती पाहिली तर त्यांमधे कलात्मक जीवन जगण्याची इच्छा दिसते. तेथे त्यांची क्राफ्ट, हस्तकला जीवन सुंदर करण्याकरिता विकसित होते. बंगालमधील स्त्री घराचे लिंपण करताना त्यावर भित्तिचित्रे काढते. ओरिसात ती तांदळाच्या पिठाने झाडे, फुले काढते. मध्यप्रदेश, ओरिसात व बिहारमध्ये धोक्राकला एक वैशिष्टचपूर्ण स्थान पटकावून आहे. या सर्वांची घरे बांधणारे कुंभार–मिस्त्री हेच यांचे वास्तुशिल्पी. या हस्तकलेत बाजारूपणा, दांभिक वृत्ती दिसत नाही. सौंदर्याविना जगण्याची कल्पनाच कदाचित आदिवासींना सहन होत नसावी.

महाराष्ट्रात सुदैवाने सौंदर्यभावना, सौंदर्यजाणीव यांवर अधूनमधून बोलले, लिहिले जाते. विविध कप्प्यांमध्ये व्यवसायातील तडजोडींनी ही सौंदर्यभावना विभागली न जाता जीवन समग्रपणे, पूर्णत्वाने जगण्याची जिद्द धरील तेव्हाच आपोआप आमची शहरे, महानगरे यांना बाजारपेठांचे स्वरूप न येता ती मानवाच्या कलात्मक जीवनदृष्टीची प्रतिके ठरतील, कलाजाणीव फैलावणारी केंद्रे होतील. प्लास्टिक आर्ट्स विकसित होण्याची पार्श्वभूमी त्यातूनच तयार होईल व सदैव तग धरील.











अनुक्रमणिका

# वाद्–संवाद्

संपादक, ‘नवभारत’ यांस,

स. न. वि. वि.

‘नवभारत’ च्या डिसेंबर १९८७ च्या अंकात श्री. नी. र. वऱ्हाडपांडे यांनी त्यांच्या परामानसशास्त्रावरील प्रतिक्रियेला दिलेल्या माझ्या उत्तराला प्रत्युत्तर दिले आहे. माझे पत्र त्यांच्या मते ‘शास्त्रीय’ चर्चेला अनुकूल नसताना, इतकेच नव्हे तर ते ‘व्यक्तिगत शिव्यां’नी भरलेले असताना त्यात ‘शास्त्रीय’ चर्चा करण्यास त्यांना सहा मुद्दे कोठे सापडले व त्यांची त्यांनी ‘शास्त्रीय चर्चा’ कशी केली असा वाचकांना प्रश्न पडला असला तर नवल नाही. त्या प्रश्नाचे उत्तर शोधण्याची गरज नसली तरी त्यांनी चर्चिलेले सहा मुद्दे कितपत शास्त्रीय आहेत याचा विचार करण्याची मात्र आवश्यकता आहे. आणि म्हणून पुन्हा हा लेखनप्रपंच करावा लागत आहे.

१) वऱ्हाडपांड्यांनी न केलेल्या विधानांचा मी त्यांच्यावर आरोप केला आहे असे त्यांचे म्हणणे आहे ! “कार्यकारणभावाची कल्पना प्रत्यक्षनिरपेक्ष तर्कावर आधारलेली आहे असे मी कोठेच म्हटलेले नाही”, असे ते म्हणतात. त्यांच्या प्रत्यक्ष विधानावरूनच काय ते स्पष्ट होईल. आपल्या ‘प्रतिक्रिये’त ते म्हणतात, “श्रद्धेच्या उलट विज्ञानाची वरील (म्हणजे कार्यकारणभावाविषयीची) भूमिका **चिकित्सेतून उद्भवलेली** आहे.” (न. भा. ऑगस्ट १९८७, पृ. ४३). आता जी भूमिका चिकित्सेतून उद्भवलेली आहे तिलाच प्रत्यक्षनिरपेक्ष म्हणतात हे वऱ्हाडपांड्यांना माहीत नाही काय ? वऱ्हाडपांडे म्हणतात त्याप्रमाणे विज्ञानाची कार्यकारणभावविषयीची भूमिका चिकित्सेतून **उद्भवलेली** असेल तर चिकित्सा अगोदरची व कार्यकारणभावाची कल्पना नंतरची आहे व ती चिकित्सेवर आधारलेली आहे असे ठरते. म्हणजेच कार्यकारणभावाची कल्पना पूर्वभावी चिकित्सेवर अगर तर्कावर आधारलेली आहे, पूर्वभावी निरीक्षणावर नाही असे ठरते. (कारण दोन परस्परविरुद्ध पूर्वभावी गोष्टींतून ती एकाच वेळी उद्भवणे– व आधारलेली असणे– शक्य नाही.). कार्यकारणभावाची कल्पना प्रत्यक्षसापेक्ष आहे असे ज्याला वाटते, तो ती कल्पना निरीक्षणातून उद्भवलेली आहे असे म्हणतो. चिकित्सेतून उद्भवलेली आहे असे म्हणत नाही. वऱ्हाडपांडे ती चिकित्सेतून, (तर्कातून) उद्भवलेली आहे असे म्हणतात यावरून ती कल्पना प्रत्यक्षनिरपेक्ष आहे असे त्यांना म्हणावयाचे आहे हे उघड आहे. तेव्हा त्यांनी न केलेल्या विधानांचा आरोप मी त्यांच्यावर केला आहे असे ते कसे म्हणतात ? हा एक तर त्यांचा बौद्धिक अप्रामाणिकपणा आहे किंवा आपण काय लिहितो हे त्यांना कळत नाही असे म्हणणे भाग आहे.

२) “टेलिपथी ही घटनाच असिद्ध असल्यामुळे ती मेंदूतील विद्युल्लहरींद्वारा होत नाही हे सिद्ध करण्यासाठी व्हॅसीलिएव या रशियन शास्त्रज्ञाची गरज नाही” असे वऱ्हाडपांडे म्हणतात. पण अशा रीतीने टेलिपथी **असिद्ध** आहे असे म्हणणारे वऱ्हाडपांडे काही वेळाने मरणोत्तर जीवन नाकारण्यासाठी टेलिपथी **खरी** आहे हे मान्य करायला तयार होतात ! (कारण मरणोत्तर जीवन नाकारायचे झाल्यास टेलिपथी खरी मानण्यावाचून गत्यंतर नाही ! ) आणि अशा विसंगत लिखाणाला ते ‘शास्त्रीय चर्चा’ म्हणतात ! (असलीच ‘शास्त्रीय चर्चा’ त्यांच्या ‘प्रतिक्रिये’तही आहे. उदा., पृष्ठ ४४ वर ते म्हणतात, “शरीरविरहित चेतना **शक्य** असली तरी ती आम्हास नको असे एखादा जडवादी म्हणू शकेल.” वास्तविक शरीरविरहित चेतना **अशक्य** म्हणणाऱ्याला जडवादी म्हणतात. तेव्हा तो असले विधान मुळीच करणार नाही. ) वऱ्हाडपांड्यांना मरणोत्तर जीवन नाकारावयाचे असेल तर त्यांना “टेलिपथी ही घटनाच असिद्ध असल्यामुळे ...... व्हॅसीलिएव या शास्त्रज्ञाची गरज नाही” हे विधान **खोटे** आहे हे मान्य करावे लागेल, व हे विधान खरे आहे असा त्यांचा दावा असेल ( म्हणजे टेलिपथी असिद्ध आहे असे म्हणावयाचे असेल ) तर मरणोत्तर जीवन **खरे** आहे हे त्यांना मान्य करावे लागेल. आणि आपली ही दोन्ही प्रतिपादने खरी आहेत असा त्यांचा

आग्रह असेल तर आपली चर्चा शास्त्रीय आहे हा दावा त्यांना करता येणार नाही.

३) समाजाच्या सुखसोयींत भर घालणाऱ्या लोकांच्या जीवनाचे नैतिक मूल्य रामकृष्ण व डायोजिनिस यांच्या जीवनाच्या नैतिक मूल्यापेक्षा श्रेष्ठ आहे असे वऱ्हाडपांडे म्हणतात. प्रेक्षकांना मंत्रमुग्ध करणारी एखादी नटीसुद्धा संतापेक्षा नैतिक दृष्ट्या अधिक श्रेष्ठ होय अशी त्यांची विचारसरणी आहे. या दृष्टीने वेश्यासुद्धा समाजाच्या सुखसोयींत भर घालीत असल्यामुळे संतापेक्षा नैतिक दृष्ट्या श्रेष्ठ ठरते! वऱ्हाडपांड्यांच्या दृष्टीने समाजातील "जास्तीत जास्त लोकांचे जास्तीत जास्त सुख" ज्यामुळे साधते ती नीती होय! या दृष्टीने जी वेश्या गिऱ्हाइकांना जास्तीत जास्त 'सुख' देते व त्यांची जास्तीत जास्त 'सोय' पाहते व त्यामुळे जिच्याकडे जास्तीत जास्त गिऱ्हाइके जातात त्या वेश्येच्या जीवनाचे नैतिक मूल्य एखाद्या रामकृष्णाच्या जीवनाच्या नैतिक मूल्यापेक्षा (गिऱ्हाइकांच्या प्रमाणात) जास्त ठरते! या भौतिक सुखवादी वा भोगवादी नीतीला स्वतः आधुनिक भौतविज्ञानाच्या तत्त्वज्ञानाचासुद्धा पाठिंबा नाही याची वऱ्हाडपांड्यांना कल्पना नसावी. पण ती असूनही काही उपयोग नाही. कारण विज्ञानाचे शोध (व्हॅसीलिएवच्या टेलिपथीविषयीच्या शोधाप्रमाणे) उडवून लावण्यात त्यांचा हातखंडा आहे.

४) परामानसशास्त्रातील शोधामुळे तत्त्वज्ञानावर काही परिणाम होणार नाही हे आपले विधान टेलिपथीला अनुलक्षून आहे असे म्हणून स्वतःचा बचाव करण्याचा वऱ्हाडपांड्यांनी प्रयत्न केला आहे. पण तो निरुपयोगी आहे. कारण टेलिपथी मान्य केल्यास तत्त्वज्ञानावर काही परिणाम होत नाही ही त्यांची समजूत चुकीची आहे.

५) अतिप्राकृतिक असे काही असूच शकत नाही हाच मुळी परामानसशास्त्राचा आणि पर्यायाने विज्ञानाचा सिद्धांत आहे.

६) परामानसिक घटनांचा खरेखोटेपणा त्या घटनांबद्दल किती मानसशास्त्रज्ञांचे मत अनुकूल (अगर प्रतिकूल) आहे यावर अवलंबून नाही.

टीप १):– टेलिपथी हा परामानसशास्त्रीय दृष्ट्या हल्ली वादाचा विषय राहिलेला नसला तरी तिला भौतशास्त्रीय दृष्ट्या बळकटी देणारा एक महत्त्वाचा शोध अलीकडे लागलेला आहे. या शोधानुसार **भौतिक विश्व हेच मुळी टेलिपथीच्या तत्त्वावर आधारलेले असल्याचे** भौतिक प्रयोगाअंती आढळून आले आहे. या शोधाचे मूळ आइन्स्टाइनने १९३५ साली प्रसिद्ध केलेल्या (व EPR या नावाने प्रसिद्ध असलेल्या) Thought Experiment मध्ये असून तो 'मानसिक प्रयोग' बराच वादग्रस्त ठरल्यानंतर १९६४ साली बेलच्या थेरमला त्याने जन्म दिला, व त्या थेरमचा प्रायोगिक पडताळा प्रथम १९७२ साली (क्लॉजर-फ्रीडमन प्रयोग) व नंतर १९८२ साली (अस्पेक्ट प्रयोग) निर्णायकपणे आला.

टीप २:– वऱ्हाडपांड्यांची ज्या कॅमेऱ्यावर इतकी भिस्त आहे त्या कॅमेऱ्याच्या साहाय्याने अमेरिकेच्या टेड सिरिओस या गृहस्थाने आपल्या विचारांची छायाचित्रे **अगणित वेळा** ('असंख्य' शब्दाची ॲलर्जी असेल तर!) फसवणूक अशक्य असलेल्या (fraud–proof) परिस्थितीत फिल्मवर उमटवलेली आहेत हे वऱ्हाडपांड्यांना माहीत आहे काय? (अगणित वेळा– innumerable times–ती उमटवली असल्यामुळेच या नव्या प्रकारच्या परामानसिक घटनेला **Thoughtography** असे नवे नाव द्यावे लागले आहे.) Camera never lies असे म्हणणाऱ्या व शरीरविरहित चेतना 'अत्यंत अविश्वसनीय' मानणाऱ्या वऱ्हाडपांड्यांवर **अदृश्य विचारांचे छायाचित्र दृश्य फिल्मवर कसे उमटते** याची 'विश्वसनीय' उपपत्ती देण्याची आता जबाबदारी येऊन पडली आहे!

टीप ३:– कार्यकारणभाव ही विज्ञानाची एक **श्रद्धा** आहे, तिला तार्किक आधार नाही या डेव्हिड ह्यूम या तत्त्ववेत्त्याच्या युक्तिवादाला आजपर्यंत कोणीही समर्पक उत्तर देऊ शकलेले नाही. (उलट कार्यकारणभावाचा खोलवर विचार केला तर विज्ञानाने मानलेले विश्वाचे भौतिक व यांत्रिक स्वरूपच खोटे असल्याचे निष्पन्न होते हे या विषयीच्या कान्ट, व्हाइटहेड, जीन्स, एडिंग्टन इत्यादींच्या तात्त्विक विवेचनावरून स्पष्ट होते). तेव्हा "**श्रद्धेच्या उलट** (कार्यकारणभावाची कल्पना) चिकित्सेतूनच उद्भवलेली आहे." असे म्हणणाऱ्या वऱ्हाडपांड्यांना या कल्पनेचे यथार्थ आकलनच झालेले नाही असे म्हणणे भाग आहे. "प्रत्यक्षनिष्ठ तर्काच्या आधारावर कार्यकारणभाव असिद्ध ठरला तर वैज्ञानिक

त्याचा त्याग करतील " हे त्यांचे विधान या समजुतीला पुष्टीच देणारे आहे. कारण 'कार्यकारणभावाचा त्याग' वैज्ञानिक कधीच करू शकणार नाहीत. तसे केले तर विज्ञानच अशक्य होईल. ती त्याची आत्महत्या ठरेल. शिवाय प्रत्यक्षनिष्ठ तर्क हा शब्दप्रयोग चुकीचा आहे. तो deduction ह्या तर्कपद्धतीस लागू होईल. मूलतः विज्ञान induction वर आधारलेले आहे. आणि induction– ज्यावर विज्ञानाचा कार्यकारणभाव आधारलेला आहे– ही विज्ञानाची श्रद्धा असल्याचे ह्यूमने दाखवून दिले आहे.

**– अद्वयानंद गळतगे**

मा. संपादक 'नवभारत' यांस

स. न. वि. वि.

आपल्या मासिकाचा जानेवारी १९८८ चा अंक नुकताच पाहण्यात आला. त्यातील '**निमित्तानि च पश्यामि**' या प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्या लेखातील पृ. २४ वर त्यांनी स्वामी विवेकानंदांच्या दिलेल्या उद्धरणाकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो. 'समतेचा आग्रह जगात जर कोणत्या धर्माने धरला असेल, तर तो केवळ एका इस्लाम धर्माने धरलेला आहे.' हे स्वामीजींचे विधान जर स्वीकारावयाचे असेल तर डॉ. आंबेडकरांनी इस्लामसारखा समतावादी धर्म सोडून बौद्ध धर्माचा स्वीकार का केला, हा प्रश्न पडतो. शिवाय इस्लाम हा जर खरोखरीच समतेचा आग्रह धरणारा धर्म असेल, तर त्या धर्मात आजतागायत स्त्रियांना पुरुषांबरोबरचे स्थान का मिळाले नाही, याचाही उलगडा होत नाही.

तसे पाहिले तर जगातील कोणताच धर्म पूर्णपणे व खऱ्या अर्थाने समतावादी म्हणता येईल, असे वाटत नाही. स्त्रियांना दीक्षा देण्यास खुद्द गौतम बुद्धानेच विरोध केल्याचे बौद्ध धर्मग्रंथांतच आढळते आणि बुद्धाचा जन्म केवळ ब्राह्मण व क्षत्रिय कुलातच होतो असे बौद्ध परंपराच सांगते. अशा स्थितीत हिंदू धर्म तेवढा विषमतावादी व इतर धर्म. विशेषतः बौद्ध धर्म, इस्लाम किंवा ख्रिश्चन धर्म हे मात्र समतावादी असे म्हणणे कितपत तर्कसंगत ठरेल ?

स्वामी विवेकानंदांचे शब्दप्रामाण्य प्रा. दाभोलकर मानतात की काय, अशीही एक शंका येते.

**–रा. पां. निपाणीकर**

⊙ ⊙ ⊙

# सार-संकलन

### केफिये

इस्राइलने १९६७ च्या युद्धात – सहा दिवसांच्या युद्धात – हस्तगत केलेल्या 'वेस्ट बँक' आणि गाझा पट्टी ह्या प्रदेशांत पॅलेस्टिनियनांची बंडाळी, तीन महिने होऊन गेले तरी, चालूच आहे. 'केफिये' हे पारंपरिक अरबी पागोटे ह्या बंडखोर वृत्तीचे प्रतीक बनले आहे. पट्टयापट्टयांच्या कापडाचे हे पागोटे बांधण्यात येते. ह्या प्रदेशातील हमरस्त्यांवरून जाणाऱ्या वाहनांवर हल्ली जी दगडफेक सर्रास होत असते तिच्यापासून सुरक्षित राहण्यासाठी वार्ताहरांनी एक क्लृप्ती शोधून काढली आहे. आपल्या मोटारीच्या बाजूला ते केफियेचे कापड बांधतात.

यासर आराफत हे पॅलेस्टाइन मुक्ती संघटनेचे (पी एल् ओ) अध्यक्ष आहेत. तीनचार दिवसांच्या दाढीचे खुंट चेहऱ्यावर बाळगणारी आणि लष्करी गणवेशात वावरणारी त्यांची मूर्ती सर्वांच्या परिचयाची आहे. हा परिवेश हेही पॅलेस्टाइन राष्ट्रवादाचे प्रतीक बनले आहे. पण केफिये अधिक जुने प्रतीक आहे. १९३८ मध्ये जेव्हा पॅलेस्टाइनवर ब्रिटिशांची सत्ता होती तेव्हा केफिये घातलेले अरब शेतकरी खेडयापाडयांतून येऊन शहरात गर्दी करीत आणि ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंडखोरीची प्रेरणा खदखदत ठेवीत असत. आज केफियेचा दुहेरी उपयोग करण्यात येतो. दंगेखोरांना केफियेने आपला चेहरा झाकता येतो. आणि अर्थात ते बंडखोर वृत्तीचे प्रतीकही आहे.

इस्राइलच्या वंशवादी पक्षाचा नेता राबाय मीर कहान यांचे एक आवडते विधान असे, की पॅलेस्टाइन असे काही नाही आहे. पॅलेस्टाइन आहे हे आज सिद्ध झाले आहे.

आज पॅलेस्टिनिअन लोक अभिमानाने जगाकडे पाहू शकतात. ह्या नवीन स्वाभिमानाची किंमत त्यांनी रक्तात चुकती केली आहे. ९ डिसेंबर १९८७ ते १५ फेब्रुवारी १९८८ पर्यंत पन्नासहून अधिक पॅलेस्टिनी 'बंडखोर' ठार झाले. शेकडो बंडखोर जखमी झाले आहेत. इस्राइली सनिकांकडून दंगेखोरांना होणारी मारहाण चालूच आहे.

ह्या बंडाळीमुळे इस्राइलने व्यापलेल्या प्रदेशातील पॅलेस्टिनिअन आणि बाहेरचे पॅलेस्टिनिअन यांच्या बळामध्ये मागे असलेले नाते आता बदलले आहे. वेस्ट बँक आणि गाझा पट्टी यांच्यातील पॅलेस्टिनिअनांकडे आता मुक्तिसंग्रामाचे नेतृत्व आल्यासारखे झाले आहे. पीएल्ओ हीच आपली प्रातिनिधिक संघटना आहे असे ते अजून म्हणतात आणि बाहेरच्या पॅलेस्टिनिअनांचे साहाय्य व पाठिंबा त्यांना अजून हवा आहे. पण आज पीएल्ओ नेतृत्व करीत नाही. ती अनुयायी बनली आहे. व्याप्त प्रदेशातील पॅलेस्टिनिअनांनी स्वयंस्फूर्तीने उठाव केला. त्यांचा एक नेता इब्राहीम डक्काक बढाईने म्हणतो, की उद्‌घाटन समारंभ साजरा करून हा उठाव सुरू झाला नाही; पंचतारांकित हॉटेलातून आम्हाला हुकूम आले नाहीत.

व्याप्त प्रदेशातील बंडखोर आणि बाहेर विखुरलेले पॅलेस्टिनिअन यांच्यामधील एक दुवा म्हणजे अल् कुद्स हा रेडिओ. (अल् कुद्स हे जरुशलेमचे अरबी नाव आहे.) दक्षिण सिरियामधून हे केंद्र चालविण्यात येते. दर दिवशी ९ तास ते बंडखोरांना सूचना देत असते आणि अरबी पॅलेस्टाइनच्या सौंदर्याचे आणि पराक्रमाचे गुणगान करणारे पोवाडे ध्वनिक्षेपित करून त्यांना प्रोत्साहन देत असते. हे केंद्र हटकून वापरीत असलेले एक तंत्र असे : प्रथम व्याप्त प्रदेशातील एका विशिष्ट गावाचा उल्लेख करून त्याने मोठ्या शौर्याने चालविलेल्या प्रतिकाराबद्दल त्याचे कौतुक करण्यात येते आणि नंतर इस्राइली सैनिकांनी जी गावे ओस पाडली असतील किंवा जमीनदोस्त केली असतील त्यांची नामावली खणखणीत आवाजात उच्चारली जाते. पॅलेस्टाइन-मुक्ती-जनता-आघाडी ह्या संघटनेच्या नेतृत्वाच्या वतीने हे केंद्र चालविले जाते. पीएल्ओचे अराफत जे नेतृत्व करीत आहेत त्याला ह्या आघाडीचा विरोध आहे. पण केंद्राचे जे ध्वनि-

क्षेपित कार्यक्रम असतात त्यांत हा पक्षभेद आणला जात नाही. फक्त पॅलेस्टिनी पुनरुत्थानाच्या प्रेरणेला आवाहन करण्यात येते. "अल्ला आपल्या सोबत आहे. विजय जवळ आला आहे." ह्या स्फूर्तिदायी वाक्याचा सतत घोष चालतो.

१९४० मध्ये नात्सींनी चालविलेल्या ज्यू जमातीच्या शिरकाणांतून वाचलेल्या ज्यूंना घेऊन इस्राइलला येणाऱ्या जहाजांना ब्रिटिशांनी केलेल्या सागरी नाकेबंदीतून चोरून वाट काढीत किनारा गाठावा लागत असे. आज इस्राइलने हद्‌पार केलेल्या व्याप्त प्रदेशातील पॅलेस्टिनींना परत आणून सोडण्यासाठी पीएल्ओने काही जहाजे भाड्याने घेतली आहेत. त्यांत अरब निर्वासितांसोबत बरेच पत्रकारही असतील अशी योजना आहे. इतिहासाची उलट्या प्रकाराने पुनरावृत्ती घडवून आणण्याच्या ह्या पॅलेस्टिनी योजनेचा इस्राइलींना अतिशय राग आला आहे. ह्या जहाजांना आपल्या जलसीमेत प्रवेश करू दिला जाणार नाही असे इस्राइलने जाहीर केले आहे. जे काही घडेल ते जगभरच्या प्रेक्षकांनी दूरदर्शनवर पाहावे अशी पॅलेस्टिनी क्लृप्ती आहे.

पॅलेस्टिनी उठाव आजच्या तीव्रतेने कितीही काळ टिकून राहील हे संभवनीय नाही. इस्राइली मुत्सद्द्यांची अटकळ अशी आहे की पॅलेस्टिनी दंगा काबूत ठेवण्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रयत्नांनी इस्राइल थकण्यापूर्वी पॅलेस्टिनी दंगेखोरांची दमछाक होईल. हे शक्य आहे. पण तरीही दंगेखोरांनी बरेच काही साधले आहे. पॅलेस्टिनी मागण्यांचे समाधान करण्यासाठी इस्राइल किती सवलती द्यायला तयार आहे हे शोधण्यासाठी अमेरिकन मुत्सद्दी आज धावपळ करीत आहेत. पॅलेस्टिनी उठाव झाला नसता तर हे घडले नसते. पॅलेस्टिनी प्रश्न जगापुढे मांडण्यात हा उठाव यशस्वी ठरला आहे. केफिये घालणारे तरुण तो परत दृष्टिआड होऊ देणार नाहीत, हा चंग त्यांनी बांधला आहे.

## अरब जग आणि इस्राइल

'इस्राइलचे अस्तित्व हा अरबी जगात खुपसलेला खंजीर आहे आणि त्याने हे जग विदीर्ण झाले आहे' हे राज्यशास्त्राच्या एका अरबी प्राध्यापकाचे उद्‌गार आहेत. हा भडक माथ्याचा माणूस आहे असेही नाही. ह्या स्वरूपाच्या भावना सर्व अरब देशांत ऐकू येतात. इस्राइलबरोबर समझोता केलेला एकमेव अरब देश जो इजिप्त, त्याचाही ह्याला अपवाद नाही.

इस्राइलच्या अस्तित्वामुळे अरब जगावर अनेकविध परिणाम झाले आहेत. इस्राइलबरोबर समझोता करायला तयार असलेले मवाळ अरब देश आणि इस्राइलचा निःपात करू पाहणारे जहाल देश अशी दुफळी अरब जगात झाली आहे. इस्राइलएवढी शस्त्रसज्जता संपादन करण्यासाठी अरब देशांना शस्त्रास्त्रांवर अपार पैसा खर्च करावा लागतो. सिरिया हे ह्याचे ठळक उदाहरण. पश्चिमी राष्ट्रांशी, विशेषतः अमेरिकेशी असलेल्या अरब देशांच्या संबंधात इस्राइलमुळे बिघाड निर्माण होतो. आज इस्राइलची जी भूमी आहे तिच्यातून बाहेर पडलेल्या किंवा हाकलून लावण्यात आलेल्या पॅलेस्टिनी जमातीच्या कडवट भावनांचाही बरावाईट परिणाम अरब जगाला भोगावा लागत आहे.

१९३० पासून जो जहाल अरब राष्ट्रवाद उफाळून आला आहे त्याचे अरब पॅलेस्टाइनचे रक्षण करणे हे एक महत्त्वाचे साध्य होते. अरब एकता प्रस्थापित करणे आणि वासाहतिक गुलामीपासून अरबांची मुक्तता करणे ही ह्या राष्ट्रवादाची उद्दिष्टे होती आणि इस्राइलच्या प्रश्नाला ह्या उद्दिष्टांच्या संदर्भात प्रतीकात्मक महत्त्व प्राप्त झाले आहे. इस्राइलविरुद्ध कडक भूमिका घेणाऱ्या अरबी देशाची राष्ट्रवादावरील निष्ठा संशयातीत ठरते. उलट, इस्राइलविरुद्ध जे राष्ट्र अयशस्वी ठरते त्याच्या सत्ताधाऱ्यांना आपल्याच जनतेचा पाठिंबा गमवावा लागतो.

१९४८ मध्ये अरब देशांनी इस्राइलविरुद्ध जे युद्ध लढविले त्याच्यात इजिप्तच्या सैन्याला नामुश्की पत्करावी लागली आणि इजिप्तचे राजे फरूक ह्यांचा बळी गेला. गमाल अब्दुल नासर, यांनी सत्ता संपादन केली आणि पुढील पंधरा वर्षे ते 'सर्व–अरब' एकतेचे आणि राष्ट्रवादाचे प्रवक्ते म्हणून राजकारणाची सूत्रे चालवीत होते. आस्वान धरणासाठी त्यांनी रशियन साहाय्य संपादन केले. सुवेझ कालव्याचे राष्ट्रीयीकरण केले. १९५६ मध्ये ब्रिटिश–फ्रेंचांनी केलेल्या स्वारीच्या संकटातून ते हिकमतीने यशस्वीपणे पार पडले आणि १९५८ मध्ये सिरियाबरोबर इजिप्तचे संयुक्त राज्य त्यांनी स्थापन केले.

अरबी राष्ट्रवादाचा हा यशाचा काळ होता. पण १९६७ मध्ये इस्राइलबरोबर झालेल्या सहा दिवसांच्या




युद्धात अरबी देशांना संपूर्ण पराभव पत्करावा लागला. इस्राइलने इजिप्तपासून सिनाइ द्वीपकल्प आणि गाझा पट्टी, जॉर्डनपासून जरुशलेम आणि वेस्ट बँक, आणि सिरियापासून गोल्डन पठार जिंकून घेतले. हा केवळ लष्करी पराभव नव्हता. अरब जगावरील ही मोठी आपत्ती होती.

ह्या पराभवाचा वचपा घेणे आवश्यक होते. १९७३ मध्ये इजिप्त-सिरियाने इस्राइलवर अचानक हल्ला चढविला. ह्या हल्ल्यात एकंदरीत इजिप्त-सिरियाच्या सैन्याची सरशी झाली. इजिप्तच्या दृष्टीने १९६७ मध्ये झालेल्या पराभवाचा अपमान धुऊन निघाला. इस्राइलबरोबर शांततेसाठी सन्मानपूर्वक बोलणी करणे शक्य झाले. इजिप्तचे राष्ट्राध्यक्ष सादत यांनी १९७७ मध्ये जरुशलेमला भेट दिली आणि १९७९ मध्ये इस्राइलबरोबर शांततेचा तह करून सिनाइ द्वीपकल्प परत मिळविले. इजिप्तचे हे धोरण राष्ट्रीय हिताला प्राधान्य देणारे होते. अरब एकता आणि अखिल-अरबी राष्ट्रवादाशी त्याचा काही संबंध नव्हता.

अरब लीग ही अखिल-अरबी राष्ट्रवादाचे संवर्धन करणारी संघटना आहे. सर्व अरब देश तिचे सभासद आहेत. इस्राइलविरुद्ध तिने आर्थिक बहिष्कार पुकारला आहे. इस्राइलविरुद्ध समान रणनीती (स्ट्रॅटेजी) आखण्यासाठी अरबी शिखर परिषदा नेमाने भरविण्यात येतात. पण एकंदरीत १९६७ पासून अरब देशांनी स्वहिताला प्राधान्य आणि अखिल-अरबी उद्दिष्टांना दुय्यम स्थान दिले आहे. इजिप्तने इस्राइलशी स्वतंत्रपणे तह केला ह्याचा अरबी जगाला मोठा धक्का बसला. अरब लीगमधून इजिप्तची हकालपट्टी करण्यात आली. पण इजिप्तने जे केले ते थोडयाबहुत फरकाने सर्वच अरब देश करीत असतात. उदा., १९८३ मध्ये सिरियाचे राष्ट्राध्यक्ष आसद यांनी पीएल्ओमध्ये आराफत ह्यांच्याविरुद्ध झालेल्या बंडाळीला पाठिंबा दिला आणि पीएल्ओला आपल्या कबजात घेण्याचा प्रयत्न केला. ताबडतोब इजिप्तचे अध्यक्ष मुबारक यांनी आराफत यांचे कायरोमध्ये शाही स्वागत केले, अखिल-अरबी राष्ट्रवादावरील आपली निष्ठा अशा रीतीने व्यक्त केली आणि इस्राइलबरोबर केलेल्या तहामुळे इजिप्तची, मलिन झालेली प्रतिमा धुऊन काढली. इस्राइलविरुद्ध अरब एक होऊ शकत नाहीत हे इस्राइलच्या फायद्याचे आहे. पण त्यातील गोम अशी आहे की इस्राइलशी शांततेचा तह करण्यासाठीही अरब एक होऊ शकणार नाहीत व झगडे कायमचे चालू राहतील.

ह्या परिस्थितीत दोन आशादायक चिन्हे आज दृष्टोत्पत्तीस येत आहेत. एक म्हणजे अरब–इस्राइली शांतता प्रस्थापित करण्यासाठी एक व्यापक परिषद बोलवावी हा दोन वर्षांपूर्वी मांडण्यात आलेला प्रस्ताव. अरब देश आणि इस्राइल यांच्या प्रतिनिधींशिवाय संयुक्त राष्ट्रांच्या सुरक्षा समितीचे सर्व कायम सदस्य ह्या परिषदेत भाग घेतील असे तिचे स्वरूप असेल. म्हणजे केवळ ब्रिटन, फ्रान्स आणि अमेरिकाच नव्हे तर रशिया व चीन हे देशही तिच्यात सहभागी असतील. इजिप्तचे मुबारक, जॉर्डनचे राजे हुसेन आणि इस्राइलचे परराष्ट्रमंत्री शिमॉन पेरीस ह्यांनी ह्या प्रस्तावाला पाठिंबा दिला आहे. ह्या परिषदेचा एक फायदा असा राहील की इस्राइलने जॉर्डनचा जो प्रदेश जिंकून घेतला आहे तो परत मिळविण्यासाठी जॉर्डनला इस्राइलशी वाटाघाटी करणे ह्या परिषदेमुळे सोपे जाईल. कारण ही बोलणी परिषदेच्या छत्राखाली होतील. एकटचा जॉर्डनने ती केली असे होणार नाही. जॉर्डन हा चिमुकला देश आहे. दोन्ही महासत्तांचा आणि बहुसंख्य अरबांचा पाठिंबा असल्याशिवाय तो इस्राइलशी तह करायला धजावणार नाही. शिवाय सोव्हिएट रशिया जिचा सदस्य आहे अशा परिषदेने जर तहाच्या अटी निश्चित केल्या असतील तर त्यांना सिरियाची मान्यता मिळणे सोपे जाईल.

पण अशा परिषदेला सर्व पक्षांची मान्यता मिळण्यात अडचणी आहेत. तिच्यामुळे मध्यपूर्वेत रशियाला अधिकृत प्रवेश मिळेल अशी अमेरिकेला भीती वाटते. सहा दिवसांच्या युद्धात जिंकलेल्या सर्व प्रदेशांवर पाणी सोडावे लागेल अशी इस्राइलमध्ये अनेकांना भीती वाटते. शिवाय पीएलओचा प्रश्न आहेच. या परिषदेत इस्राइल आणि पीएलओ ह्या दोहोंनाही संमत होईल अशा प्रकारे पीएलओला कसे समाविष्ट करावे याचे उत्तर अजून कोणाला सापडलेले नाही.

शांततेचे दुसरे प्रसादचिन्ह म्हणजे इराण व इराक यांच्यामध्ये चालू असलेले युद्ध. हे युद्ध आठव्या वर्षात पदार्पण करीत आहे. इस्राइलपेक्षा इराणकडून अरबांना अधिक मोठा धोका आहे अशी काही अरब नेत्यांची

भावना झाली आहे. आमान येथे गेल्या नोव्हेंबर महिन्यात अरब लीगची जी बैठक झाली तिच्यात अरब देशांना इजिप्तबरोबर परत संबंध प्रस्थापित करण्याला परवानगी देण्यात आली. कारण पाच कोटी इजिप्शियनांचा अरबांना मोठाच आधार वाटतो. विशेषतः तुरळक लोकवस्ती असलेल्या आखाती अरब देशांना इराणपासून त्यांना जो धोका दिसतो त्याच्या तुलनेने इजिप्तने इस्राइलशी जोडलेल्या संबंधाला त्यांच्या दृष्टीने फारसे महत्त्व राहिलेले नाही.

पण अरब देशांच्या दृष्टिकोणात घडून आलेल्या ह्या स्थित्यंतराचे महत्त्व किती आहे ह्याचे आज उत्तर देता येणार नाही. ते अर्थात इजिप्तच्या पथ्यावर पडले. अध्यक्ष मुबारक यांनी तावडतोब आखाती अरब देशांना लष्करी मदत करण्यासाठी वेगवेगळ्या योजना जाहीर केल्या. इस्राइलशी शांतता प्रस्थापित करणारा तह केल्याबद्दल राष्ट्रवादी अरबांकडून इजिप्तवर जी टीका होत असे ती ह्यामुळे काहीशी सौम्य झाली. पण इतर अरब देशांनी असले अनुकरण करावे आणि इस्राइलशी समझोता करावा असा आग्रह धरताना इजिप्त दिसत नाही.

सर्व अरब देश इराणविरुद्ध एकवटले आहेत असेही दिसत नाही. इराक आणि इराण हे दोन मस्तवाल देश एकमेकांशी झुंजत राहिले तर ते आपल्या सोयीचेच आहे अशी प्रारंभी सौदी अरेबियाची कल्पना होती. पण १९८७ मध्ये जेव्हा कुवैतने आपल्या तेलवाहू जहाजांसाठी अमेरिकन आरमाराचे संरक्षण मागितले तेव्हा हे युद्ध सीमित राहणार नाही, इतरत्र पसरेल ही नवी भीती सौदी अरेबियाला वाटू लागली. शिवाय गेल्या हाज यात्रेच्या वेळी मक्का येथे इराणच्या प्रेरणेने शिया पंथीयांनी जी दंगल केली तेव्हापासून इराण आपल्या जीवावर उठला आहे आणि येन केन प्रकारेण त्याला सौदी राजवट नष्ट करायची आहे अशी सौदी अरेबियाची खात्री पटली. तोपर्यंत इराकला आर्थिक पाठिंबा देत असतानाही इराणबरोबर सौदी अरेबियाने आपले संबंध ठीक ठेवले होते. पण सिरिया इराणबरोबर मित्रत्वाचे संबंध राखीत आहे. अरब देशांना अजून अरब-एकता स्थापन करता आलेली नाही.



## साभार पोच

**रस्ते दुभगत आहेत**– भ. मा. परसवाळे; सांगाती प्रकाशन, ४१, भाग्यनगर, नांदेड; १९८६; पृष्ठे ७३; किंमत २५ रुपये.

**स्पंदने एका न्यासाची**– ( सर दोराबजी टाटा ट्रस्टची पन्नास वर्षे ) लेखक आर. एम. लाला; अनुवादक सुभाष भेण्डे; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे–३०; १९८७; पृ. १८४; किं. ३० रुपये.

**बाईमाणूस**– सरोजा परुळकर; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०; १९८८; पृ. ९७; किं. ३५ रुपये.

**भारतीय स्वातंत्र्यलढा आणि मराठी लेखक**– डॉ. सदा कऱ्हाडे; शलाका प्रकाशन, अंधेरी ( प. ), मुंबई– ४०० ०५८; १९८८; पृ. ८८; किं. १५ रुपये.

* **ओलांडताना**– लीला पाटील; श्रीविद्या प्रकाशन; २५० शनिवार पेठ, पुणे–३०; १९८८; पृ. १३९; किं. ३५ रुपये.

* **समर्थ साहित्यातील आकृतिबंध**– डॉ. सौ. उषा जोशी; प्रकाशक : कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, आंध्र प्रदेश, इसामिया बाजार, हैदराबाद– ५०० ०२७; १९८८; पृ. ३३५; किं. १०० रुपये.

* **गृहस्थी भिक्खू**– प्रफुल्लकुमार लोखंडे– सातारकर, शलाका प्रकाशन, ४/३२ एम. आय. जी. कॉलनी, डी. एन. नगर, जे. पी. रोड, अंधेरी ( प. ), मुंबई– ४०० ०५८; १९८७; पृ. ५९; किं. १५ रुपये.

* **स्त्रीसूक्त**– ( कवितासंग्रह ) अश्विनी धोंगडे; श्रीविद्या प्रकाशन; २५० शनिवार पेठ, पुणे– ३०; १९८८; पृ. ७३; किं. रु. २७·५०.

हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून
श्री. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका






